# दाभाड्यांच्या घराण्याचा इतिहास.

हें

पुस्तक

रा. मारुतीराव रामचंद्र पराडकर

यांनीं

तयार करून

'पुर्णवैभव' छापखान्यांत छापून प्रसिद्ध केलें.

आवृत्ति १ ली.

नवंबर सन १९८९.



किंमत १२ आणे.

हें

पुस्तक

श्रीमंत राजेश्री

खंडेराव बाबुराव उर्फ

आबासाहेब दाभाडे सेनापति संस्थान

तळेगांव यांस त्यांचा कुलाभिमान, विद्या-

भिरुची, औदार्य, मनमिळाऊपणा,

आणि स्वधर्मनिष्ठा इत्या-

द्यनेक गुण पाहून क-

र्त्यानें कृतज्ञतापूर्वक

अर्पण केलें

असे.

# प्रस्तावना.

शास्त्रीय विषयांचीं पुस्तकें, गोष्टींचीं पुस्तकें अगर दुसऱ्या कोणत्याही प्रकारचीं पुस्तकें वाचण्यापेक्षां ऐतिहासिक पुस्तकें वाचणें जास्त श्रेयस्कर आहे. कारण अशा पुस्तकांच्या वाचनापासून मनाचें रंजन होऊन आपल्या पूर्वजांच्या कथा आपल्यास सहजीं समजतात व त्या नुसत्या समजतात एवढेंच नव्हे, तर त्या कथांच्या श्रवणानें आपल्यास या संसारसागराच्या लाटांत पुष्कळ मदतही होते हें पुष्कळ लोकांच्या अनुभवास आलें असेल यांत शंका नाहीं. त्यांतही ज्या पुरुषांचा इतिहास ल्याहावयाचा त्या पुरुषांनीं चढ उतार व ऐन भर या तिन्हीही स्थिति अनुभविल्या असतील तर त्या पुरुषांच्या इतिहासाचा संसारी मनुष्याला किती उपयोग होतो याचा खरोखरीच पार लागत नाहीं.

तळेगांवचे दाभाडे यांच्या घराण्याच्या इतिहासाची तरी हीच स्थिति अवलोकन करून या घराण्याचा इतिहास आपण ल्याहावा अशी माझ्या मनांत उत्कट इच्छा झाली.

परंतु ही माझी इच्छा पुरी कशी व्हावी या विवंचनेंत मी आहें तोंच माझ्या एका मित्राकडून मला उत्तम प्रकारची प्रेरणा होऊन मी हें लहानसें काम

शक्तिनुसार करण्यास आरंभ केला. या बाबतींत खुद्द श्री० आबासाहेब दाभाडे सेनापति यांनीं ही हरएक बाबतींत माझ्या मित्राच्या मार्फत मदत केली त्याबद्दल त्यांचे मी आभार मानावे तेवढे थोडेच आहेत.

हा इतिहास श्री० दाभाडे यांचे जवळ जी एक लेखी प्रत लिहिलेली आहे तिच्या मुख्य आधारानें व चार पांच निरनिराळ्या इंग्रजी इतिहासांच्या थोड-थोड्या आधारानें तयार केला आहे.

इतिहासाचें पुस्तक लिहिण्यास जे गुण मनुष्यांत अवश्य पाहिजेत ते गुण माझ्यामध्यें मुळींच वसत नसतांही हें ऐतिहासिक पुस्तक लिहून तयार करण्याचें मी धाडस केलें आहे. करितां यांतील भाषेकडे किंवा सरणीकडे अथवा छापण्यांत जी कमजास्त असेल त्याकडे बिलकुल लक्ष न देतां विद्वज्जनांनीं केवळ दाभाड्यांच्या घराण्याच्या इतिहासाकडेच चित्त देऊन त्या इतिहासांत कांहीं कमजास्त असल्यास पहावें अशी माझी इच्छा आहे.

आतां याच बाबतींत लांबलचक चऱ्हाट लावून लोकांचा वेळ खाण्यापेक्षां पुनः एकवार मला या कामांत मदत करणाऱ्या सर्व गृहस्थाचे आभार मानून ही प्रस्तावना मी पुरी करतों.

ग्रंथकर्ता.

# वंशवेल.


एसपाटील
खंडेराव
राजी
त्र्यंबकराव
शयवंतराव
बाबूराव
त्रिंबकराव
शिवराव
यशवंतराव
दत्तक
त्रिंबकराव
बाबूराव
दत्तक
खंडेराव आबासाहेब
हयात आहेत.

श्री गजानन प्रसन्न.

# भाग १ ला.

## उपोद्घात.

या सर्व व्यापी सर्व साक्षी जगच्चालकानें या सृष्टीची घटना इतकी अघटित केलेली आहे कीं, तिची उत्पत्ति कधीं झाली, सद्यस्थिति कशी आहे, लय कधीं होणार, तिची सर्व व्यवस्था कोणत्या धोरणानें चालणार, व अखेर कोणत्या कलावर जाणार हें कसाही विशाल बुद्धीचा मनुष्य असला, तथापि त्यास कालत्रयींहीं समजावयाचें नाहीं. बरें जर समजावयाचें नाहीं, तर सृष्टीच्या घटनेंत अथवा क्रमांत कांहीं नियम अथवा निर्बंध नसावेत अशी कोणाची कल्पना व्हाणार आहे, पण तीही कल्पना व्यर्थच जाते असा अनुभव दृष्टीस पडतो.

आज जगांतील लोकांस जेवढा पृथ्वीचा भाग ठाऊक झाला आहे तेवढाच तो आहे किंवा याच्यापेक्षां दुप्पट, पांचपट, दसपट किंवा अनंतपट भाग अद्याप शिलक असून आह्मी मानव प्राणी नुसत्या घमेंडीनें आह्मांस सर्व पृथ्वी सापडली ह्मणून आपलेच ठिकाणीं डोलत आहों, हें तरी कोणी सांगावें ! पृथ्वीच्या भोंवतीं समुद्राचा वेढा आहे असें हल्लीं

आपल्यास माहीत आहे, पण जेवढा समुद्र आप-ल्यास आज माहीत आहे तेवढाच तो आहे किंवा या समुद्रांतून लाख कोस गेलें असतां पुढें आणखी एक किंवा अनेक पृथ्वीचे घेरे व त्या भोंवतीं आण-खी कित्येक समुद्र सांपडतील किंवा नाहीं हें तरी कोणीं सांगावें ?

एकंदरीत या सृष्टीचा किंवा सृष्टींतील प्राणि-मात्रांचा अथवा सृष्टींतील कोणत्याही भागाचा अथवा राष्ट्राचा कोणताच निर्बंध आपल्यास नि-श्चयानें सांगतां येणार नाहीं हें जरी खरें आहे, तथापि त्या परमपूज्य जगच्चालकाकडे दृष्टि देऊन सृष्टीचा किंवा त्यांतील कोणत्याही एका भागाचा अथवा भाग तरी कशाला, एकाच प्राण्याचा जरी क्रम पाहूं गेलें तरी देखील त्यांत आपल्यास कांहीं तरी नियम अथवा निर्बंध आढळतोच. यावरून हा नियम अथवा निर्बंध जरी आपल्यास आढळतो तरी तो जाणण्याची अथवा पूर्वींच ठरवून ठेवण्या-ची आपल्या मनुष्य प्राण्याची ताकद नाहीं, एवढेंच म्हणून त्या अतर्क्य जगन्नियंत्याच्या प्रभूस शरण जाऊन तो जी अल्पस्वल्प बुद्धि देईल त्या प्रमाणें वागून सर्व प्राणी मात्रांवर समदृष्टि ठेवून कालक्रमण क-रावें हाच उत्तम पक्ष ठरत नाहीं काय ? असो.

सृष्टिकर्त्याचा त्याच्या या अघटित घटनेंत कांहीं तरी नियम असतो असें जें वर सांगितलें आहे, त्याचा अनु-भव सर्वांस पदोपदीं येण्यासारखा आहे. आपण पुष्कळ

निरनिराळीं मनुष्यें पहातों त्यांत आज जीं आपल्यास हंसतां खेळतांना दिसतात तींच उद्यां उलट स्थितींत आढळतात व जीं आज दुःखी कष्टीशीं दिसतात तींच उद्यां सुखकर स्थितींत व आनंदांत अढळतात ! यावरून सृष्टीचा नियम दुःखितास दुःखच द्यावयाचें किंवा सुखी प्राण्यास सुखच द्यावयाचें असा असल्याचें ठरत नाहीं. परंतु सुखदुःख हें पाळीपाळीनें प्रत्येक प्राण्याच्या वाटणीस येतें, असा एक साधारण सृष्टिनियम ठरतो.

हें उदाहरण एकाच प्राण्याचें अथवा मनुष्याचें झालें. परंतु सृष्टींतील प्रत्येक देशाचा किंवा राष्ट्राचा प्रकार याहून भिन्न आहे असें मुळींच नाहीं. सृष्टिनियमाप्रमाणें प्रत्येक राष्ट्रास किंवा देशासही सुखद अथवा दुःखद स्थिति त्याच्या पाळीप्रमाणें यावयाचीच. याला प्रत्यंतर पहाण्यास फार लांब जाणें नलगे.

या जगतांत आपल्यास ठाऊक असे जे निरनिराळे देश आहेत त्या सर्वांची पूर्वींची स्थिति कशी होती व हल्लीं त्यांस कशी स्थिति प्राप्त झाली आहे, याचा विचार केला ह्मणजे वर जें काय ह्मटलें त्याचा प्रत्यय प्रत्येकास सहजीं येणार आहे. ते परक्यांचे देश तरी कशाला ? आपलें हें भरतखंडच कां घ्याना;

या आपल्या प्रिय भरतखंडानें आजपर्यंत जें सुख भोगलें आहे तें खचित दुसऱ्या कोणासही मिळालें

नसेल व अतां हा आमचा हिंदूंचा देश जें दुःख भोगीत आहे किंवा आजपर्यंत भोगीत आला आहे, तसें दुःखही याच्या मागें दुसऱ्या एकाद्या देशानें भोगलें नसेल किंवा पुढेंही कोणावर असलें अनिवार्य दुःख भोगण्याची पाळी येईल असेंही वाटत नाहीं;

ही या देशावर दुःखाची पहिलीच खेप आहे असें मात्र कोणीं समजूं नये. कारण पुराणांतल्या गोष्टी पुराण्या झाल्या ह्मणून त्या तूर्त पुराणांतच ठेवून आलीकडील गोष्टींत आपल्यास पाहिजे आहे तसलें कांहीं सांपडतें कीं नाहीं याचा जर आपण विचार केला, तर आपल्यास इष्टवस्तूचा लाभ होऊन आपला जो दाखला मिळविण्याचा मूळ हेतु तोही, पण तडीस जाणार आहे.

हा दाखला पहावयाचा ह्मणजे आपल्यास य देशाची कोणती तरी एक सुखद व कोणती तरी एक दुःखद स्थिति शोधली पाहिजे. हल्लींची आपल्या हिंदुस्थान देशाची स्थिति सुखद आहे वा दुःखद आहे हें आज निर्णयानें मुळींच सांगतां येणार नाहीं, व ती सांगण्यांत कांहीं होईल असेंही ह्मणवत नाहीं. कारण आज या देशावर आपल्या इंग्रज बहाद्दरांसारखे न्यायी, चतुर, शहाणे, दूरदृष्टी, दयाळू व परम कुशल असे राजे राज्य करीत आहेत. त्यांच्या राज्यांत वित्ताची किंवा जीविताची भीती ह्मणून राहिलेली नाहीं, चोरांचे पुंडावे नमी-

नदोस्त होऊन चोहींकडे शांततेचें वारें वहात आहे. दरवडे, खून, मारामाऱ्या इत्यादि अनेकविध व्याधींपासून आजमित्तीस प्रजा मुक्त आहे. या आपल्या राजाची चोर, जुगारी, घातकी इत्यादि दुर्गुणप्रचूर मंडळीस जितकी दहशत आहे तितकीच साव, सत्वस्थ व रास्त मार्गानें कालक्रमण करणाऱ्या प्रजेच्या मनास यांच्या राज्यापासून सुख व शांति वाटत आहे. तात्पर्य सर्व प्रजा या एकछत्री राजाच्या अमलाखालीं इतकी शांततेंत आहे कीं, पूर्वी अशी शांतता कधींच कोणाच्या अनुभवास आली नसेल असें खास वाटतें.

बरें, देशांत इतकी शांतता आहे, स्वतः राजे न्यायी, शहाणे, दूरदृष्टी व पूर्ण राजकारणपटु असे आहेत, प्रजाजनाच्या मागें कोणत्याही प्रकारचा ताप ह्मणून नाहीं, अशी स्थिति असल्यावर सर्व हिंदुस्थानस्थ लोक सुखसमुद्राच्या ऐन भरतींत असावे कीं नाहीं? पण आमचे हिंदुस्थानस्थ प्रजाजन हल्लीं सुखी आहेतसे दिसत नाहींत एवढेंच नव्हे, तर आजमित्तीस मोठी शोचनीय स्थिति असून दिवसेंदिवस ती त्यांची दुर्दशा सांवरण्याच्या तरी आटोक्यांत राहील कीं नाहीं हाच मोठा संशय पडला आहे!

आज हिंदुस्थानांत जिकडे पहावें तिकडे प्रत्येक कामांत घोळ पडल्यासारखा दिसत आहे. पांच पन्नास वर्षां पूर्वी जी कारागिरी देशांत झळकत हो-

ती ती आजमितीस "कारागिरी वाढली पाहिजे" "कारागिरी वाढली" पाहिजे अशा अर्थाचीं लक्षावधि व्याख्यानें ऐकतां ऐकतांच समूळ नाहींशी होऊन गेली. व्यापार वाढवावा ह्मणून ओरडत असतांही दिवसेंदिवस व्यापार किंवा रोजगार तर गेलाच, पण चार पांच्या इकडल्या तिकडे टाकून जी दमडी घ-नडी मिळावयाची ती तरी अव्याहत मिळून आप-ल्या कुटुंबाचा निर्वाह होतो कीं नाहीं या फिकिरींत लोक आहेत. पूर्वींची सचोटी, पूर्वींचा प्रामाणिक-पणा, पूर्वींची देशभक्ति, पूर्वींची श्रद्धा वगैरे अने-क उपयुक्त व अपूर्व गोष्टी कधींच लयास गेल्या असून सर्व देशभर आपापसांत दुही, दुर्व्यसनासक्ति, एकमेकांची बेपर्वाई, अपलपोटेपणा, सर्व प्रकारची भ्रष्टता व साधारण दौर्बल्य यांचा सर्व देशभर पूर आला असून देशांत दुर्भिक्ष्याचें वारें चहूंकडे वाहूं लागलें आहे; आणि प्रत्येक मनुष्यामागें त्याच्या कमजास्ती ऐपतीप्रमाणें विवंचना लागली आहे असा भास होतो! तर हा सर्व दुःखद प्रकार घडून येण्यास दुसरें कोणीही कारणीभूत झालें नसून केवळ देशाच्या दुर्दशेमुळें ही स्थिति प्राप्त झाली आहे असेंच उघड ठरतें. असो.

ही या हिंदुस्थानची सद्यस्थिति झाली. या स्थितीचें वर्णन आज आह्मी पूर्णपणें केलें आहे असें मुळींच नाहीं. कारण ही सद्यस्थिति आज सर्वांच्या डोळ्यापुढें मूर्तीमंत उभी असल्यामुळें पुनः

तीच स्थिति लोकांस बोटानें दाखविण्यांत बिलकुल अर्थ नाहीं असें समजून आपल्या देशास एक वेळां याहीपेक्षां अनिवार्य अवस्था प्राप्त झाली असून त्यांतूनही कालाच्या अनुकूलतेमुळें हिंदुस्थानस्थ लोकांची कांहीं दिवसपर्यंत कशी सुटका झाली होती, याचें थोडेंसें वर्णन करून कालाच्या अनुकूलप्रतिकूलतेचा फेरा कसा असतो याची फोड वाचकांस करून देण्याची आपण खटपट करूं.

सुमारें अकराशें वर्षांपूर्वीं हिंदुस्थान देशांत चहूंकडे निरनिराळीं हिंदूंचीं राज्यें असून त्या देशांतील प्रजा सर्व प्रकारानें सुखांत नांदत होती. यांतील बहुतेक सर्व राजे क्षत्रीय कुलांतील असून ते नेहमीं स्वधर्मरत असल्यामुळें हिंदुस्थानांत जी राज्यपद्धत व जे राजधर्म सांगितलेले आहेत त्याप्रमाणें ते वागून आपल्या प्रजेचें पुत्रवत् पालन करीत. अशी सुखद स्थिति कांहीं दिवस हिंदुस्थानांतील लोक अनुभवीत असतां कालचक्राचा फेरा उलटा फिरल्यामुळें ह्मणा, अगर संपति व ऐषारामादि प्रकारांचा स्वाभाविक असाच परिणाम व्हावयाचा असें ह्मणा, पण या वेळीं या हिंदुस्थानांतील हिंदुलोकांचें स्वातंत्र्य नष्ट होऊन या सर्व पवित्र भरतखंडावर परकीय व परधर्मी अशा मुसलमानी राजांचा अम्मल झाला.

हा या वेळीं परतंत्रतेचा वारा जो सपाटून सुटला तो एक किंवा दोन वर्षेंच सतत राहिला नसून

शें दोनशें वर्षांत देखील तो झंजावात शमला नाहीं तर त्याचा सारखा सोसाटा या आर्यभूमीवर सतत एक हजार वर्षांच्या जवळ जवळ चालू होता हें पुष्कळ इतिहास वाचणाऱ्यांस माहीत असलेंच पाहिजे.

या प्रचंड व भयानक झंजावाताच्या योगानें या भरतखंडांतील कित्येक मोठमोठे वृक्ष मुळासकट उमळून पडले. कित्येकांच्या शाखा बऱ्याच जोरानें कडाकड मोडून त्यांची नुसतीं खोडें मात्र जाग्यावर राहिलीं. कित्येक घरें व वाडे जमीनदोस्त होऊन त्यांचा मागमूसही नाहींसा झाला, व त्यांच्या खालीं लक्षावधि मनुष्यप्राण्यांचा फडशा उडाला. कांहीं लहान मोठीं गावें व शहरें अजीबात मोडलीं जाऊन कांहीं नवीनच वसलीं गेलीं. या प्रलयरूपी वायुगुळीच्या झपाट्यांत कित्येक धरणीकंपही उद्भवल्यामुळें अनेक ठिकाणचे मोठमोठे धिप्पाड पर्वत नाहींसे होऊन तेथें सपाट जमिनी किंवा खळगे खांचा झाल्या. नद्या कोरड्या पडल्या. समुद्राचें वाळवंट बनलें. मोठमोठ्या जगद्व्याळ देवालयांचें आंतील पवित्र मूर्तींचेंसुद्धां उन्मीलन होऊन तेथें मनोऱ्यासारखें कांहींसें दिसूं लागलें. तात्पर्य या विशाळ व लांबचलांब वावटळींत या भरतभूमीचें पहिलें सर्व तेज, पहिले पेहेराव, पहिलें स्वरूप, पहिली अमदानी, पहिली विद्या हीं सर्व जाऊन तेथें अगदीं नवे नवे प्रकार उद्भवले! असो.

अगोदरच मुसलमान लोक फार दांडगे, आणि त्यांतही त्यांनीं हिंदु लोकांवर तरवारीच्या खऱ्या जोरानें राज्य मिळविलें होतें. मग त्यांच्या धांगडधिंग्यास काय विचारावयाचें आहे ? त्यांचा अम्मल हिंदुस्थान देशावर बसला मात्र तों त्यांनीं प्रथमच हिंदु लोकांस लुटण्याची सुरुवात केली. त्यांची प्रथम अति पवित्र मानलेलीं देवालयें जमीन दोस्त करून तेथें आपल्या मुसलमानी धर्माच्या मशिदी बांधल्या. देवांच्या मूर्ती फोडून टाकून देवालयांतील संपत्ति लुटून नेली. तेथें ज्यांनीं आडकाठी केली त्यांस जिवें मारून जे त्यांस शरण आले त्यांस हुसेनी धर्माची दीक्षा देऊन पादाक्रांत केलें. या मुसलमानांच्या कारकीर्दींत प्रत्येक गांवचा वसूल एकदां नव्हे दोनदां नव्हे तर चार चार पांच पांच वेळां गरीब बिचाऱ्या प्रजेस द्यावा लागे ! मुसलमान लोकांच्या कारकीर्दींत हिंदु ह्मटला ह्मणजे मातीच्या मोलानें जाई. त्यांच्या वित्ताच्या व जीविताच्या संरक्षणाची जबाबदारी कोणावरही नसे. राजास प्रजा पोटच्या लेंकराप्रमाणें असावयाची, पण या कारकीर्दींत सर्व राजधर्मी लोकांच्या नजरा हिंदु स्त्रियांच्या संबंधानें अति घाणेऱ्या असत, प्रजेवर कोणत्या वेळेस काय घाला येईल ही नेहमीं भीति असे, त्यावेळीं शक्ति हाच कायदा बनून राहिला होता !

या लोकांच्या या आडदांड वर्तणुकीमुळें पुष्कळ

हिंदु लोकांनीं आपलीं सर्व घरें दारें व चीज वस्त कृष्णार्पण करून वनवास स्वीकारला होता. हिंदु लोकांचीं शेंकडों घराणीं रसातळास मिळून त्यांचें नायनाट झालें होतें. क्षत्रिय तेज ज्यांच्या मध्यें वसत होतें असे शेंकडो मांडलीक राजे या चक्रवर्ती मुसलमान राजांशीं टक्कर देऊन आपलीं शरीरें धारातीर्थीं अर्पण करीत. कांहीं राजे मुळींच भेकड असल्यामुळें पवित्र अशा क्षत्रिय धर्माचा, क्षत्रिय अभिमानाचा, क्षत्रिय कुळाचा व क्षत्रिय तेजाचा त्याग करून मुसलमानांशीं बेटी व रोटी व्यवहार करीत. या क्रमानें आर्यावर्तांतील क्षत्रियतेज दिवसेंदिवस नष्ट होत जाऊन गरीब बिचाऱ्या प्रजेस मुळींच कोणाचा आश्रय नाहींसा झाल्यामुळें ती सर्व प्रजा दीन वदन करून सैरावैरा हिंडूं लागली !

या धुमाळीच्या योगानें हिंदुस्थानच्या लोकांवर एक विलक्षण प्रकारचा परिणाम घडून आला. तो परिणाम असा कीं, मूळ हिंदु लोक आपल्या पवित्र मानलेल्या चाली रीती विसरून गेले. पोषाखाची पद्धत राज्यकर्त्या प्रमाणें सुरु झाली. स्वधर्माचा दिवसेंदिवस लोप झाला हिंदु लोकांच्या विद्या अति उच्च स्थितीप्रत पोचल्या असतांही त्यांस मुसलमानी कारकीर्दींत राजाश्रय न मिळाल्यामुळें हळुहळु लयास गेल्या. हिंदुच्या नवरा बायकांचे जे हक्क शास्त्राप्रमाणें चाळावयाचे ते बाजूस राहून राजकर्त्यांचें अनुकरण त्यांच्यांत शिरूं लागलें.

दहापांच श्वान एकाच भाकरीवर तुटून पडल्यास जसे ते एकमेकांच्या उरावर बसतात तद्वत हिंदु लोकांत अपसांतील कलहास सुरुवात झाली!

जिकडे पहावें तिकडे हिरवे झेंडे फडकत. आज कोणाच्या शरीरावर शिखासूत्र पहावें तों उद्या त्याच्याच शरीरावरील शिखा सूत्र नाहींसें होऊन दाढी दिसूं लागावी अशी स्थिति आली! असा एकसहा दपटशा सतत एक हजार वर्षे सारखा चालू असल्यामुळें हिंदुपण लयास जाऊन ते लोक कांहीं एका प्रकारचेच बनले होते. आणि तशा त्या अति दुर्धर स्थितींत प्रत्येक मनुष्यास असें वाटे कीं, आतां यापुढें हें जुलमी राज्य जाऊन स्वसत्ता कालत्रयींही होणें नाहीं! तात्पर्य सर्व हिंदु लोकांसही मुसलमानी कारकीर्द मोठी दुःसह झाली असून तिच्या योगानें सर्वांस देमाय धरणी ठाय करून सोडलें होतें.

मुसलमानांच्या कारकीर्दींत असा जुलूम व अशी धुमाळी होती. तरी ते लोक जात्या शूर व दांडगे असल्यामुळें त्यांच्या मनांत कपट ह्मणून फारसें वसत नसे. या कारणानें हिंदु लोक त्यांच्या कारकीर्दीस त्रासून जंगलांत गेले असतां त्यांच्या मागें जंगली कायदा लावून ते त्यांची पाठ पुरवीत नसत लोकांस निःशस्त्र करून मग त्यांच्यावर पाहिजे तशा जोरानें राज्य करावें, हा मागूबाईपणा त्यांच्या आंगांत बिलकुल वसत नव्हता. लोकांनीं आपण

होऊन आपली रीत भात, आपला धर्म, आपली अब्रू सोडून आपण होऊन आपल्या बायका राज्य कर्त्यांकडे पाठवाव्या अशा विद्येचें भुग्ळ घालण्याचें अवसान त्यांच्या आंगांत मुळींच नव्हतें. नवीन नवीन कायद्यांची टांकसाळ त्यांच्या राज्यांत झडली जाऊन लोकांच्या मागें कायदेशीर नवेंनवें शुक्ल-काष्ठ लावण्याचें शहाणपण किंवा वस्तादगिरी त्यांच्या आंगीं वसत नव्हती, पण त्यांची हुकी हाच कायदा आणि दंडा हाच त्यांचा अंमल ही स्थिति होती !

या प्रकारें हिंदुस्थानांतील लोकांस यांच्या कारकीर्दींत अति दुःखांत "समुद्रांत एक रति" य मानानें वर सांगितलेल्या कांहीं बाबींत जरी सुख होतें तरी मुसलमानांची कारकीर्द पुढें पुढें तर अगदीं असह्य होत चालली होती हें अगदीं निर्विवाद आहे.

अशा त्यांच्या अंदाधुंदीच्या एक छत्री राज्यांत कोणी हिंदूचा अभ्युदय होऊन पुनः हिंदुपद बादशाही या भरतभूमीच्या प्रारब्धीं असेल असें कोणाच्याही स्वप्नांत आलेलें नव्हतें. परंतु सर्व शक्ति, सर्व साक्षी, सर्वेश्वर याच्या सृष्टीनियमाचा कोणास अंत लागणार ? त्यानें रावणादिकांसारख्या प्रबळ, मायावी व कर्तुमकर्तुमची घमेंडी मारणाऱ्या दैत्यांस देखील पाणी पाजण्यास सोडलें नाहीं तेथें बिचाऱ्या दांडग्या अविंध शिश्नानष्ट मनुष्याचा पाड तो काय !

त्याच्या नियमाच्या तडाक्यांत जेव्हां आपली मुसलमान मंडळी सांपडली तेव्हां त्यांचा तो आवेश, त्यांची ती दारुण शक्ति, त्यांचा तो जुलूम, आणि त्यांची ती दांडगाई जागच्या जागींच राहून ते निव्वळ हतवीर्य होत्साते हिंदु लोक काय काय खेळ करतात व आपल्यास कसे झकवितात हें पहात तटस्थ बसले !

खरें पाहिलें असतां मुसलमान लोकांच्या या दारूण काहुरांतून हिंदु लोकांस पार पडणें अति दुरापस्त होतें. तथापि सृष्टीच्या नियमाप्रमाणें जेव्हां हिंदू लोकांच्या नष्टचर्याचे दिवस संपून त्यांस कालाची अनुकूलता आली तेव्हां काय विचारावें ? आकाशांत ज्याप्रमाणें घोर ढगांचें काहूर उठून त्यांतच खग्रास सूर्य ग्रहणाचा योग येतो व नियमित कालानें ढग आपोआप वितळून जाऊन सूर्यावरील ग्रहणाचें पडळही नाहींसें होऊन चोहीकडे एकदम प्रकाश पडतो तद्वत या भरभूतमीवर या अंधःकार मय परकी मुसलमानांच्या काहुरांत दक्षिण महाराष्ट्रांत कोणाच्या ध्यानींमनीं नसतांही एक दैदीप्य मान सूर्यासारखा तेजःपुंज शिवाजी या नांवानें मराठा अवतरला ( सन १६२७ ) आणि त्यानें सर्व अंधःकाराचा नाश करून सर्व हिंदू लोकांस मोठ्या कुशलतेनें आणि तेजस्वी अशा पराक्रमानें इहपर लोक साधनाचा सत्पथ दाखविला.

हा शिवाजी महाराजांचा अवतार जर या आणि

बाणीच्या वेळीं मुळींच झाला नसतां तर दिल्लीच्या अवरंगजेब बादशाहासारख्या धर्मवेड्या बादशाहाच्या झपाट्यांत या सर्व भरतभूमींत एक तरी शिखासूत्र राहिलें असतें किंवा नाहीं याचा वानवाच दिसतो ! पण छे, इतक्या निकरास जेथें गोष्ट येऊन ठेपली होती तेथें " धर्म संस्थापनार्थाय संभवामि युगे युगे " असें आश्वासन देणारा जो सर्वात्मा तो कां स्वस्थ रहाणार ? अर्थात त्यानें निकराची वेळ पाहून शिवाजीच्या रूपानें आपली विभूति प्रगट करून " गोब्राह्मण प्रतिपालक " हें आपलें भूषण आणखीं एकवार कायम करून घेतलें !

या वेळीं काळाची अनुकूलता तरी कशी होत गेली ती पहा. एक पूर्ण ब्रह्म सनातन शिवाजी महाराज या अवनी तलावर अवतीर्ण झाल्या बरोबर रावणवधाच्या वेळीं श्री रामचंद्राच्या साह्यार्थ ज्याप्रमाणें वानर रूपानें तेहतीस कोट देवतांनीं अवतार घेऊन रामरावणाच्या युद्धांत आपापल्या शक्तीप्रमाणें आपापले भाग उचलून एकंदर कार्य निर्विघ्नपणें तडीस नेलें, त्याचप्रमाणें शिवाजी महाराजांचा उदय झाला मात्र तों इतर साह्यकारी देवताही चाकरमान्याच्या रूपानें अवतीर्ण होऊन शिवाजी महाराजांच्या हेतूस तडीस पोंचवून सर्व हिंदु जनांस आणखी एकवार स्वराज्य भोग देण्याच्या उद्योगास लागल्या !

या तेहतीस कोटी देवतांमध्यें मालूसरे, फसलकर,

पिंगळे, घोरपडे, श्रीरामदास, वगैरे हजारों वीर व मसलतगार अवतरून त्यांनीं आपल्या या हिंदुधर्मसंरक्षकास यथाशक्ति साह्य केलें, त्यांतच आपल्या या पुस्तकाचा नायक दाभाडे या नांवानें अवतीर्ण झाला.

अनुकूल काल आला ह्मणजे सर्वच गोष्टी अनुकूलशा होऊं लागतात. श्री शिवाजी महाराज अवतीर्ण झाले त्या वेळीं त्यांच्या साह्यार्थ त्यांच्या बरोबरीचे स्नेहीच त्यांच्या तोडीचे झाले, असें नसून त्यांचे हुजरे, त्यांचे शिपाई, त्यांचे घोडे व त्या वेळेस उत्पन्न झालेल्या त्यांच्या स्त्रिया देखील युद्धकला निपुण व राज्यकारस्थानपटु अशा होत्या. आणि ह्मणूनच शिवाजी महाराजांस एवढ्या थोरल्या कचाट्यांतून स्वतः सहज पार पडतां येऊन आपल्या लोकांचा उद्धार करतां आला.

आमचा नायक "दाभाडे" उपनांवाचा देखील कोणी मोठा शिवाजी महाराजांच्या बरोबरीचा होता असें नसून शिवाजी महाराजांपाशीं यःकश्चित हुजरेपणाची नोकरी एकनिष्ठेनें करणारा असा होता. परंतु तो स्वतः पन्याच्या खाणींतील अति तेजस्वी एक उत्तम हिराच असल्यामुळें वेळोवेळीं पूर्ण स्वामिभक्तीच्या मार्गानें उदयास येऊन महाराजांच्या बरोबरीचा झाला, हें पुढील हकीगतीवरून वाचकांच्या सहज लक्षांत येणार आहे.

या दाभाड्यांचा मूळ पुरुष यसपाटील बिन बाजपाटील दाभाडे हा होय. हे मौजे तळेगांव तर्फ

चाकण, सरकार *जुन्नर, प्रांत *औरंगाबाद येथील मोकद्दम होते.

तळेगांव हा गांव पुण्यापासून सुमारें १२ कोसांवर आहे. हल्लीं हा गांव पुणें जिल्ह्यांत मावळ तालुक्यांत मोडतो. हा गांव पूर्वीं मोठ्या रहदारीचा असे. या गांवच्या दक्षिण बाजूस उंच उंच डोंगरांच्या रांगा आहेत. गांवास नदी मुळींच नाहीं तथापि पूर्वींच्या पद्धतीप्रमाणें मजबूत एक तलाव श्री० दाभाडे यांनीं आपल्या पदरच्या पैशानें बांधला असून त्याचेंच पाणी हल्लीं सर्व गांवास पुरतें. या तलावास पुरवठा करणारें पाणी मोठ्या युक्तीनें डोंगराच्या पायथ्यापासून सारखें बांधून आणलें असून या तलावांत सोडलें आहे. गांवास बागायत जमीन बरीच असून एकंदर जमीन चांगली पिकाऊ आहे. पूर्वीं कोंकण व देश यांच्या दरम्यानचें हें एक नाकेंच असल्यामुळें तळेगांवचे दाभाडे ह्मणजे साताराच्या पश्चिमदिशेकडील द्वाराचे द्वारपाळच बनलेले असत. हल्लीं या गांवास जी आय. पी. रेल्वेचें बरेंच मोठें स्टेशन असल्यामुळें

---

* त्या वेळीं जुन्नर हा सुभा—जिल्हा असून चाकण तालुका होता. व जुन्नर जिल्ह्यांत व चाकण तालुक्यांत तळेगांव मोडत असे. हल्लीं जसे इलाखे आहेत तसाच पूर्वीं औरंगाबाद म्हणून एक इलाखा होता, व त्या इलाख्यांत बहुतेक सर्व दक्षिणप्रांत मोडत असे. सन १६५० सालीं राजपुत्र औरंगझेबास शहाजहानानें दक्षिणचा सुभा नेमिल्यावरून त्यानें औरंगाबाद येथें आपलें ठाणें केलें.

या गांवीं बरीच रहदारी असते. तळेगांवची लोक वस्ती २००० घरांची असून नुकत्याच झालेल्या खानेसुमारींत तेथील लोकसंख्या बायकामुलांसुद्धां अजमासें ४००० भरली होती.

दाभाडे यांचें मूळठिकाण हें तळेगांवच. यांची हल्लीं एक मोठी गढी या गांवांत असून शिवाय दोन तीन वाडे आहेत. आज या तळेगांवास जी थोडीशी शोभा राहिली आहे, ती केवळ दाभाड्यां-च्या वस्तीमुळेंच आहे, हें तें गांव पहाणाराच्या स-हज नजरेस येतें.

"दाभाडे" हे क्षत्रिय कुलोत्पन्न सोमवंशी असून यांचें गोत्र शांडिल्य आहे. यांचें देवक क-ळंबाचें आहे याच्या घराण्यांत कट्यारीचें महात्म्य विशेष आहे. कारण विजया दशमीचे दिवशीं दाभाड्याचें घराणें कट्यारीची पूजा करतें.

थोरले शिवाजी महाराज यांच्या समवेत मुसल-मानाशीं टकरा देऊन जे लोक उदयास आले, त्यां पैकींच "दाभाडे" हे एक असल्यामुळें अशा या वीर पुरुषांचा अभ्युदय अशा प्रकारें झाला व त्यांस "सेनापती" हें पद कसें प्राप्त झालें याचें वर्णन पुढील भागांत केलें आहे.

# भाग दुसरा.

## अभ्युदय.

सेनापति दाभाडे यांचे मूळपुरुष येस पाटील बिन बाज पाटील हे पूर्वींच्या भागांत सांगितलेंच आहे. थोरल्या शिवाजी महाराजांच्या उदयकाळीं येस पाटील हे महाराजांच्या सन्निध हुजरेपणाच्या पेशानें राहिले होते. येस पाटील हे आपल्या पेशाची चाकरी एकनिष्ठपणानें करीत असल्यामुळें महाराजांची त्यांजवर मोठी कृपा होती.

सन १६६७ सालीं थोरले शिवाजी महाराज सिंहगडावर मुलामाणसांसह असतां औरंगझेब बादशहाचा जसवंतसिंग नांवाचा रजपूत सरदार दक्षिणेंत येऊन त्यानें सिंहगडास वेढा घातला, त्या वेळीं निरुपाय होऊन महाराज त्याच्या स्वाधीन झाले; आणि संभाजी महाराजांस बरोबर घेऊन ते दिल्लीस जाऊं लागले, त्या वेळीं त्यांनीं येस पाटील दाभाडे यांस मुलामाणसांची सेवा करण्याची आज्ञा केली व त्याप्रमाणें येस पाटलांनीं एकनिष्ठपणें महाराजांच्या मुलामाणसांची सेवा मोठ्या नेकीनें केली.

येस पाटील यांस दोघे चिरंजीव होते. थोरले खंडोजी दामाडे व धाकटे शिवाजी दामाडे. हे उभयतांही चिरंजीव वडिलाप्रमाणेंच एकनिष्ठ से-

षक आहेत असें समजून थोरले शिवाजी महारा-
जांची त्यांच्यावरही पुर्ण मेहेरबानी होती; आणि
ईश्वरेच्छेनें शिवाजी महाराजांचें आयुष्य जर वाढ-
लें असतें तर प्रसंगवशात् खंडोजी व शिवाजी दा-
भाडे यांची कर्तृत्वशक्ति पाहून महाराजांच्या हाता-
नेंच यांनीं मोठ्या पदवीस चढावें अशी वेळ खास
आली असती. पण कालचक्राचा फेरा निराळ्या
रीतीनें फिरल्यामुळें महाराजांच्या कारकीर्दींत या
घराण्याचा जसा अभ्युदय व्हावयास पाहिजे होता
तसा महाराजांच्या अल्पायुषामुळें झाला नाहीं.
आणि दाभाड्यांचे घराणें उदयकालाच्या अगदीं
समीप येऊन धडकलें असतांच महाराजांच्या अव-
ताराची समाप्ती झाली. ही गोष्ट सन १६८० त
घडली.

महाराजांच्या समाप्तीचा हा प्रसंग सर्व देशास
मोठा कहरसा भासला. त्यांतही त्यांचा सहवास
ज्यांना रात्रंदिवस होता अशा दामाडयासारख्यांस
तर त्या कहराची परमावधीच झाली. तथापि म-
हाराजांनीं देह ठेविल्यावरही येसाजी पाटील यांनीं
आपल्या उभयपुत्रांसह महाराजांच्या वंशाची सेवा
एकनिष्ठपणानें करावयाचीच असा दृढनिश्चय केला
होता.

थोरले महाराज कैलासवासी झाल्यावर त्यांचे
वडीलपुत्र संभाजी महाराज हे गादीवर बसले. हे
महाराज जात्या फार शूर होते, तथापि आंगांत हू-

डपणा विशेष असल्यामुळें व लहानपणापासून वडिलांस यांच्यावर देखरेख ठेवण्यास अवसरच सांपडला नसल्यामुळें, थोडेसे फंदी निपजले. तथापि दामाडयांनीं त्यांची सेवा चाकरी एकनिष्ठपणानें करण्यास कांहीं इतकेंही मागें घेतलें नाहीं.

याच संधीस दिल्लीचा बादशहा औरंगजेब हा आपल्या बरोबर मोठी थोरली फौज घेऊन दक्षिणेंत आला. त्याचा विचार मराठ्यासारखीं जीं टोंगळें वर येऊन मुसलमानी सत्तेस शह देण्याच्या बेतांत असतील त्यांच्यावर एकदां पाटावरवंटा फिरवून सर्व जमीनदोस्त करून टाकावीं असा होता. या हेतूनें औरंगजेबानें बरोबर फौज घेऊन दक्षिणेंत स्वारी केली. त्या वेळी संभाजी महाराज कोठें शिकारीस गेले असतां बादशहाच्या फौजेनें त्यांजवर छापा घालून त्यांस पकडलें. या वेळीं थोडीशी लढाई झाली. लढाईची धामधूम होण्यापूर्वींच संभाजी महाराज यांनीं आपले धाकटे बंधु राजाराम महाराज यांच्या बरोबर येस पाटील दामाडे खंडोजी दामाडे, व शिवाजी दामाडे यांस देऊन पन्हाळा वगैरे किल्ल्याच्या बंदोबस्ताकरितां पाठविलें होतें.

औरंगजेब बादशहाची फौज अलोट असून संभाजी महाराजांबरोबर जुजबी फौज असल्यामुळें त्यांचा सहज पराभव होऊन ते मुलसमानांच्या हस्तगत झाले. मुसलमान लोक व त्यांतूनही औरंगजेबासारख्या बादशहाच्या वेळचे असल्यामुळें, ते

दयेचे केवळ सागरच होते ! त्यांनीं संभाजी महाराज हातीं लागतांच त्यांचे प्रथम हाल हाल करून अखेरीस त्यांस निधानगतीस पोंचविलें ! व त्याचे पुत्र शिवाजी ऊर्फ शाहूमहाराज यांस हस्तगत करून घेऊन तो माघारा चालता झाला.

ही गोष्ट इसवी सन १६८९ सालीं घडली. ही गोष्ट घडली त्या वेळीं राजाराम महाराज त्रिवर्ग दाभाड्यांसुद्धां रायगडास होते. येसपाटील दाभाडे आपल्या वृद्धापकाळापर्यंत जरी हुजऱ्याच्या वेशानें महाराजांची एकनिष्ठ सेवा करीत होते, तथापि त्यांच्या हयातींत खंडोजी दाभाडे आपल्या हुषारीनें बऱ्याच पदवीस चढले होते एवढेंच नव्हे, तर वेळोवेळीं ते राजकारस्थानाच्या मसलतींतही असत. संभाजी महाराज मारले गेले व त्यांचे चिरंजीव शाहूमहाराज यांचें वय लहान असल्यामुळें खंडेराव दाभाडे यांनीं संभाजीची स्त्री येसूबाई हिच्या संमत्तीनें अशी मसलत केली कीं, तूर्त राजाराम महाराज यांस पट्टाभिषेक करून राज्यकारभार चालवावा, व मोगलांचा प्रवेश महाराजांपर्यंत पोंचूं नये, ह्मणून राजाराम महाराजांनीं एके ठिकाणीं न राहतां वरचेवर ठिकाण बदलीत असावें.

इकडे औरंगजेबानें संभाजी महाराजांचे पुत्र शिवाजी ऊर्फ शाहू महाराज यांस व त्यांच्या मातुश्री येसुबाई यांस पकडून आपल्या बरोबर घेऊन गेला. आणि राजाराम महाराजांचा इतका पाठलाग केला कीं,

अखेरीस राजाराम महाराज यांस आपल्या जनानखान्यासुद्धां कर्नाटक प्रांतांत पळून जावें लागलें. (सन १६९० ) त्यांचेबरोबर हे त्रिवर्ग दाभाडे व आणखी १८ सरदार होते.

राजनिष्ठा ही एक अजब चीज आहे. ही चीज ज्यास सांपडली असेल तो धन्य यांत शंका नाहीं. या चिजेपुढें स्वतःचीं बायकामुलेंही तुच्छशीं भासतात. आमच्या दाभाडे मंडळींत राजनिष्ठा ह्मणजे निव्वळ फुरफुरत होती. औरंगजेबाच्या त्रासानें राजाराम महाराजांनीं ज्या वेळीं पन्हाळा किल्ला सोडून गुप्त ह्मणजे उदम्याच्या रूपानें प्रयाण केलें, त्या वेळीं त्यांचा जनानखानाही बरोबर निघाला, हें वर सांगितलेंच आहे. हें सर्व मंडळ सरासरी मोठ्या जुलमानें व संकटानें चंदीचंदावरापर्यंत पोंचलें. त्यांचा पुढें जिंजीस जाण्याचा बेत होता. पण चंदीस मुक्काम असतांनाच श्री० राजाराम महाराज यांस पुत्ररत्न झालें. ही गोष्ट इसवी सन १६९१ त घडली. पुत्रप्राप्ती झालेली पाहून राजाराम महाराजांनीं मोठा पुत्रोत्साह केला. आणि दाभाड्यांची एकनिष्ठ सेवा मनांत आणून या उत्सवानिमित्य याच वेळीं महाराजांनीं तळेगांवानजीक इंदुरी व धामणें या नांवांचे गांव खुद्द दाभाडे यांस व उरसें नांवाचें गांव त्यांच्या पत्नीस वंश परंपरेनें इनाम करून दिलें.

इतक्यांत औरंगजेबास राजाराम महाराज कर्ना-

टकांत जात आहेत ही खबर लागतांच, त्यानें कर्नाटकांतील आपल्या झुल्फुकारखां नांवाच्या सुभेदारास राजाराम महाराजांचा पिच्छा पुरविण्यास हुकूम दिला. राजाराम महाराज चंदीचंदावरास पोंचून त्यांचा पुत्रोत्साह चालला आहे, तोंच झुल्फुकारखां यास बादशहाचा हुकूम पोंचून तो चंदीचंदावर येऊन त्यानें त्या ठिकाणास वेढा घातला.

राजाराम महाराजांस आपण वेढ्यांत सांपडलों असें कळतांच, त्यांनीं आपले लोक जमा करून मसलत केली त्यांत येसपाटील दाभाडे यांस जनानखान्याच्या संरक्षणास चंदीचंदावरास ठेवून खंडोजी दाभाडे व शिवाजी दाभाडे यांसह महाराजांनीं जिंजीस जावें असें ठरलें.

मुसलमानांचा वेढा भोंवतालीं असल्यामुळें महाराजांनीं व खंडेराव आणि शिवाजी दाभाडें यांनीं गवत वहाणाऱ्या पोरांचीं सोंगें घेऊन शत्रूच्या कोटांतून पार झाले. येस पाटील यांनीं महाराजांच्या जनानखान्यांतील सर्व स्त्रियांसही निरनिराळीं सोंगें देऊन हद्दपार केल्या. पण या धांदलींत त्यांचीं स्वतःचीं बायका पोरें बाहेर काढण्यास त्यांस संधी मिळाली नाहीं. तें पाहून त्या एकनिष्ठ बहादरानें सख्ख्या बायका पोरांची पर्वा न करतां त्यांची तेथल्या तेथेंच कत्तल करून तो आपल्या धन्याच्या बायका मुलांच्या रक्षणास निघून चालता झाला! अहाहा! त्या पुरुषाचीही केवढी एक निष्ठ सेवा!

असे राजभक्त पुरुष ज्या देशांत ज्यावेळीं उत्पन्न होतील त्या देशांत त्यावेळीं शतावधि औरंगजेबांनीं कितीही छात्या बडविल्या, तरी काय व्हावयाचें आहे? धन्य अशा राजभक्तांची माता! खरेंच अशा पुरुषांचें रोज प्रातःस्मरणांत भजनच करीत असावें! असो. एवढ्यानेंच झालें नाहीं. याही-पेक्षां विशेष चमत्कार अद्याप आपल्यास या घराण्यांतील पुरुषांचे बघावयाचे आहेत.

राजाराम महाराज शत्रूच्या वेढ्यांतून जिंजीस जावयास निघाले, त्यावेळीं त्यांचे बरोबर घोडें गाडी वगैरे कांहीं एक नसून नुसते हे उभयतां दाभाडे बंधु मात्र होते. आपल्या मागें शत्रु येतील कीं काय ही भीती सर्वांस होतीच. स्वतः राजाराम महाराजास एकसारखें पळत जाण्याची मुळींच संवय नव्हती. अशा आणीबाणीच्या प्रसंगीं या खंडोजी व शिवाजी दाभाड्यांनीं महाराजांस पाठगुळीं घेऊन एक दिवसांत पंचवीस कोस सारखी धांव मारली!

त्या रात्रीं एके ठिकाणीं मुक्काम करून दुसरे दिवशीं पुनः ती मंडळी निघाली. त्यावेळीं महाराजांस पाठीवर घेऊन खरा राजभक्त व देश संरक्षक शिवाजी दाभाडा सुमारें ८।१० कोस जात आहे, तोंच त्याची छाती फाटून त्यास रक्ताच्या गुळण्या येऊन तो निचेष्टित होऊन पडला! हें पाहून खंडोजी दाभाड्यापेक्षांही राजाराम महाराजांस शिवाजी दाभाड्याबद्दल परमावधीचें दुःख वाटलें, आणि तो

रस्त्यांत अस्ताव्यस्त पडला आहे, व हे उभयतां त्याच्या जवळ तटस्थ मुद्रेनें उभे आहेत, इतक्यांत त्या शिवाजी बहादरानें डोळे उघडून महाराजांस झटलें " महाराज, आतां माझी आशा आपण धरूं नका, शत्रू येऊन आपल्यास गांठतील हें ठीक नाहीं, गादीचें रक्षण प्रथम झालें पाहिजे. माझ्या करितां उभे राहून न जाणो राज्यास धोका बसेल." हें ऐकून राजाराम महाराज सद्गदित अंतःकरणानें बोलले कीं, " जें होणार असेल तें खुशाल होवो, पण माझ्यानें तुला अशा स्थितींत येथें एकटा टाकून पुढें जाण्यास पाऊलच उचलवत नाहीं." हे महाराजांचे शब्द ऐकून तो साक्षात् शिवांश शिवाजी दाभाडे उत्तर करतो; " महाराज, माझी किंमत किती ? मी एक गेलों तर आपल्यास शेकडों लोक मिळतील, पण प्रथम राज्य राखलें पाहिजे याचा विचार करावा." इतके शब्द रणधीर शिवाजी दाभाडे बोलतो न बोलतो तोंच त्यास आणखी रक्ताची गुळणी येऊन त्यानें जणूं आपल्या धन्यास उशीर होईल कीं काय या भीतीनेंच या नाशवंत जगास शेवटचा राम राम ठोकून परलोकीं गमन केलें ! हर, हर ! काय परमेश्वरा, तुझी ही अगाध करणी ? ऐन बाणीच्या प्रसंगीं तूं असल्या अमोल्य विभुती प्रकटवून आपल्या प्रियजनांचें प्रिय करतोस, तेव्हां तुझा महिमा व तुझी अगाध शक्ति किती तरी झणून वर्णन करावी ? पण देवा, असले मोहोरे तूं आम-

ऱ्यांत उत्पन्न करावेस व सुटी नियमाप्रमाणें त्यासही घ्यावेस, तरी आह्मी अधमांनीं असल्याच्या नांवाचा कोठें उच्चारही करूं नये हें कां आमचें कर्तव्य ? देवा तूं आमच्यावर या अधमपणाबद्दल रागावला नसशील कां ? पण तूं मुळींच करुणासागर असल्यामुळें कधींच रागावणार नाहींस एवढेंच नव्हे, तर पुढें मागें प्रसंग पडल्यास तूं पुनः देशील आह्मा हिंदूंकरितां असल्या शिवाजीसारख्या विभुती उत्पन्न करून देशील, यांत काडी इतकीही शंका नाहीं ! अस्तु.

याप्रमाणें त्या रणशूर व पूर्ण स्वामिभक्त शिवाजी दाभाड्याचा अंत झालेला पाहून खंडेराव दाभाडे आणि राजाराम महाराज यानीं वेळ न गमावतां त्याचें शव उचलून शेजारींच एक ओहोळ होता, त्यांत टाकलें, आणि त्यावर थोडीशी माती लोटून आपण पुढें चालते झाले. त्या वेळीं पुनः खंडोजी दाभाड्यानीं आपल्या धन्यास पाठीवर घेऊन इच्छित स्थळीं नेलें ! या वेळीं महाराजांची या घराण्यावर जी प्रीति बसली, ती सांगतां पुरवत नाहीं. पण त्याचा मोबदला देण्यास महाराजांचेच दैव दैवहाऱ्यांत नसल्यामुळें कांहीं दिवसपर्यंत सवडच झाली नाहीं !

हा राजाराम महाराजांवरील बिकट प्रसंग दाभाड्यांनीं आपल्यांतील बरीच मंडळी बळी देऊन वांचविला, हें आतां कोणास जास्त स्पष्ट करून सांगितलें पाहिजे असें मुळींच नाहीं; व याकरितां मरा-

त्यांची गादी एका अनिवार्य अडचणींतून वांचविली, याबद्दल सर्व महाराष्ट्री यांनीं तळेगांवकर दाभाडे सेनापति यांचे खचित उतराई झालेच पाहिजे.

याप्रमाणें राजाराम महाराज जिंजीस दाखल झाले व पुढें बरेच दिवस ह्मणजे सन १६९८ पर्यंत त्यांचा मुक्काम जिंजीसच होता. महाराज तेथें पोंचल्यावर येसू पाटील दाभाडेही महाराजांच्या मुलामाणसां सुद्धां सुखरूपपणें जिंजीस येऊन पोंचले. राजाराम महाराजांची इतर कारस्थानी मंडळी कारस्थानांत चूर होतीच, त्यांत प्रल्हाद निराजी ह्मणून जो मुत्सद्दी होता तो अनुपमेय असे व राजाराम महाराजांना त्याच्यावरच इकडील सर्व राज्यभार सोंपविला होता.

इकडे औरंगजेब बादशहा कोणत्या मुहूर्तावर दिल्लीहून निघाला होता तो परत दिल्लीस मरेपर्यंत गेलाच नाहीं. त्यामुळें मराठे लोकांचे घोडे कांहीं केल्या पागेस लागले नाहीत. औरंगजेबाचा वास सदा सर्वकाळ दक्षिणदिशेंत झाल्यामुळें मराठे लोकांस नेहमीं सैरावैरा होऊन धांवधाव करावी लागत असे. तथापि तितक्यांतच राजाराम महाराजांच्या मंडळीची मसलत सिद्ध होऊन त्यांनीं महाराजांस पुनः देशीं आणून महाराजांची राजधानी सातान्यास करावी. असा निश्चय केला.

मसलत झाल्याप्रमाणें महाराज स्वदेशीं येऊन राज्यावर स्थित झाले. इतक्यांत औरंगजेबाचें

भीति होतीच, याकरितां त्यांनीं आपला मुक्काम कायम न ठेवितां उत्तर दिशेकडे प्रयाण केलें.

राजाराम महाराज महाराष्ट्रांतून जे निघाले ते थेट गोदावरीच्या तीरानें खानदेशांत शिरले. या मोहिमेंत खंडेराव दाभाडे होतेच. खानदेशांत जाऊन मराठ्यांनीं आपला चौथ व सरदेशमुखीचा हक्क वसूल करण्याची झोड चालविली. आणि महाराजांनीं ठिकठिकाणीं आपले सरदार ठेविले, त्यांत खंडोजी दाभाडे यांस बागलाण प्रांताची बाकी वसूल करण्याचें काम सांगितलें.

थोड्या दिवसांनीं आपल्या सर्व मंडळांसह राजाराम महाराज मोहिमेहून परत आले. त्यांत खंडेराव दाभाडेही परत आले. महाराजांची स्वारी या वेळीं पन्हाळा किल्ल्यावर होती. तेथें येस पाटील दाभाडेही होतेच. पण वृद्धापकाळामुळें त्यांस सन १७९९ त देवाज्ञा झाली.

राजाराम महाराजांच्या पदरची जुनी मंडळी हळूहळू नाहींशी झाल्यामुळें त्यांचेंही मन उद्विग्न झालें होतें. तेवढ्यांत खंडेराव दाभाडे यांची एकनिष्ट सेवा, उत्तम प्रकारची मसलत व लढाईचें धाडस हीं पाहून महाराजांनीं त्यांस सेनाखासखेल हें पद देऊन वस्त्रं, शिरपेंच, हत्तीं, घोडा, निशाण व जरिपटका हीं दिलीं. शिवाय प्रांत जुन्नर व हरिचंद्र व प्रांत पुणें व परगणें आकोलें व परगणें जावळें या महालांची सुर पाटीलकी, दर शेंकडा

रुपये २ व भेट बकरें एक व इनाम पुत्र पौत्रादि वंशपरंपरेनें करून दिलें. त्याच प्रमाणें खंडेराव दाभाडे सेनाखासखेल यांस बीड प्रांताचे कुळकर्ण शेंकडा ४ रुपये प्रमाणें करून दिलें.

पुढें थोड्याच अवकाशानें राजाराम महाराज यांची प्रकृत बिघडून त्यांस सिंहगडास देवाज्ञा झाली फेब्रुवारी सन १७००

या सर्व हकीगतीवरून असें उघड ठरतें कीं, कालाचें अनुकूल ज्यावेळीं प्राप्त होतें त्यावेळीं सृष्टी घटनेच्या नियमाप्रमाणें भरभराटीस येणाऱ्या देशांत लोकही तशाच बेताचे व मासल्याचे उत्पन्न होतात. या दाभाड्यांच्या घराण्यांतीलच पुरुष पहाना ? त्यांनीं एका राज भक्तीकरितां मुलामाणसांची तर काय, पण सर्वांत प्रिय जो आपला प्राण त्याची सुद्धां बिलकुल पर्वा केली नाहीं. मग राजाच्या संकटावस्थेंत आपण पुढें सरण्याच्या प्रसंगांची तर बिशादच नाहीं. अस्तु.

या मासल्याचे लोक जेथें उत्पन्न होतील तेथें दुर्दशा हा शब्द कधीं तरी वसेल काय ? परमार्थाच्या बाबतींत जसें तुकाराम, रामदास, ज्ञानेश्वर प्रभृति मंडळ जगद्वंद्य आहे त्याच मानानें जागिक लौकिकार्थाच्या बाबतींत असली मंडळी वंद्यच होत. त्यांतही आमच्या कथानकाचे नायक जे "दाभाडे" ते तर त्या सुवीर पुरुषांच्या मालिकेंत मेरूमण्याच्या ठिकाणीं शोभतील यांत संदेह नाहीं.

या पुरुषांचें कथानक येथेंच संपलें असें नसून या घराण्यातील पुरुषांनीं वर सांगितल्यापेक्षांही विशेष प्रकारचे पराक्रम करून आपली पूर्ण राजनिष्टा व्यक्त केली आहे एवढेंच नव्हें तर त्यांनीं या सर्व महाराष्ट्रीयांवर प्रसंगोपात एवढा अनुग्रह करून ठेविला आहे कीं, ते त्यांचे उपकार कधींच कोणाच्यानें फिटावयाचे नाहींत! तो प्रकार पुढील भागांत वाचकांस सांपडणार आहे.

# भाग तिसरा.

## खंडेराव दाभाडे सेनापति-पूर्वाधन.

श्रीमंत छत्रपति राजाराम महाराज यांच्या अखेरीपर्यंत खंडेराव दाभाडे सेनापति यांचा पराक्रम, एकनिष्टता व मानसन्मान याचें दिग्दर्शन मागील भागांत झालेंच आहे. त्याच्या पुढील वृत्तांत या भागांत वर्णन केला आहे तो वाचकांनीं सावधान चित्तानें ऐकावा.

श्री० राजाराम महाराज यांस दोन स्त्रिया होत्या. पैकीं वडिल स्त्रिचें नांव ताराबाई साहेब असें होतें. त्यांच्या पोटीं शिवाजी महाराज ह्मणून एकच पुत्र संतान होतें. त्यांस प्रथम महाराजांच्या मागें पन्हाळा किल्लयावर पट्टाभिषेक झाला.

पण ते महाराज मुळींच अप्रमिष्ट असल्यामुळें राजा-राम महाराजांची धाकटी स्त्री राजसबाई यांचे चीरंजीव श्रीमंत संभाजीराव महाराज यांस पट्टाभि-षेक करून श्रीमंत ताराबाईसाहेब यांनीं स्वतः संपूर्ण सहावर्षें पर्यंत राज्यकारभार चालविला.

इतक्यांत ह्मणजे सन १७०७ त थोरले संभाजी महराज याचे जीरंजीव श्रीमंत शिवाजी उर्फ शाहु-महाराज हे दिल्लीच्या बादहाच्या अटकेंत होते त्यांस बादशाहांनीं मेहेरबानीनें कांहीं हक्क देऊन बंद मुक्त केलें. श्रीमंत महाराज शाहुराजे कैदेतून मुक्त झाल्यावर त्यांनीं आपला दक्षिणेकडचा मार्ग स्वीकारला. ते सरासरी वऱ्हाडांतून खानदेशपर्यंत आले तों त्यांस कांहीं मराठे सरदार येऊन मिळाले. त्या सरदारांसह महाराजांची स्वारी नाशिकपर्यंत आल्यावर त्यांनीं आपण आल्याची खबर श्री॰ ताराबाई साहेब यांस पन्हाळ किल्ल्यावर पोंचविली.

ताराबाई साहेब तरी बायको मनुष्य होऊन महांबाज शहाणी होती. तिनें श्री. शाहुमहाराज आल्याची खबर लागतांच ताबडतोफ खंडेराव दाभाडे सेनाखासखेल, पिंगळे, पेशवे, व मंत्री यांस बोलावून आणून आज्ञा केली कीं, तुह्मी शाहुमहाराजास लहानपणापासून पुष्कळ वेळां पाहिला आहे. तोच हा शाहु आहे किंवा नाहीं याबद्दल तुह्मी आपली खातरजमा करून घेऊन जर हाच खरा शाहुराजा आहे अशी तुमची बालंबाल खात्री होईल

तर त्यास मोठ्या सन्मानानें इकडे आणावें आणि तद्विरुद्ध कांहीं प्रकार दिसल्यास ह्मणजे अर्थात तो कोणी तोतया असल्यास सर्वांनीं मिळून त्याचें पारिपत्य करावें.

ही ताराबाईसाहेबांची आज्ञा होतांच खंडेराव दाभाडे पुढें सरसावून ह्मणाले. महाराज आपली आज्ञा आह्मास शिरसा मान्य आहे. परंतु आलेला मनुष्य महाराज नसून तोतया असेल तर आह्मी त्याचें पारिपत्य करूंच, तथापि ते जर खचितच शाहू महाराज असतील तर आमच्याकडून त्यां- च्याशीं निमक हरामी कधींही करवणार नाहीं. मग आपलें मन फिरून जर कांहीं वेडा वांकडा प्रकार दृष्टीस पडेल तर आह्मास ईश्वर जशी बुद्धी देईल त्याप्रमाणें वागूं. कारण आपण जसे आह्मास धनी आहांत तसे तेही आमचे धनी आहेत. करितां आमचे प्राण गेले तरी आमचे हात त्यांच्यावर उ- ठावयाचे नाहींत ह्याचा आपण विचार करावा.

हें दाभाडे यांचें बोलणें ऐकून ताराबाईनें साफ उत्तर दिलें कीं, तुह्मी पिढीनपिढीचे इमानी नोकर आहांत. शाहूराजास तुह्मी सहज ओळखूं सकाल आणि तुह्मी त्यास पक्केपणीं ओळखलेंत ह्मणजे माझें बिलकुल कांहीं ह्मणणें नसून तुमच्या बाहेर मी जा- वयाची नाहीं हें तुह्मी पक्कें समजा.

ताराबाईनें इतकी खात्री करून सांगितल्यावर

हें सर्व दरबारी मंडळ पन्हाळ्याहून निघून नाशि-कापर्यंत येऊन थडकलें.

ही बातमी शाहूमहाराज यांस समजतांच त्यांनीं खंडेराव दाभाडे यांस पत्र पाठविलें कीं, तुह्मी पुरातनपासून इमानी नोकर आहांत सबब तुह्मी आह्मास तावडतोब भेटावयास यावें आणि उभयतांच्या भेटींत जसा प्रकार घडून येईल त्या बेतानें पुढें वागणूक ठेवण्यास ठीक पडेल. वाडवडिलांचा ज्याप्रमाणें तुमच्यावर पूर्ण भरंवसा होता त्याप्रमाणें माझाही सर्वस्वी तुमच्यावर पूर्ण भरंवसा आहे. करितां भेटींत तुमच्या सल्ल्यानें जसें ठरेल त्याच्या बाहेर आह्मी कधींही जाणार नाहीं.

हा शाहूमहाराजांचा निरोप आल्यावर खंडेराव दाभाडे यांनीं महाराजांस पत्रद्वारें विनंति केली कीं, आह्मास श्रीमंत ताराबाईसाहेबांनीं पाठविलें आहे. त्यांच्या आज्ञेप्रमाणें आह्मी आपल्या भेटीस येतों. भेट झाल्यावर जशी खातरजमा होईल त्याप्रमाणें श्रीमंत मातोश्री ताराबाईसाहेबांस आह्मी पत्रद्वारें हकीगत कळवूं आणि त्यांची जशी आज्ञा होईल त्याप्रमाणें आह्मी करूं. मात्र इतका सर्व प्रकार शेवटास जाईपर्यंत आपण श्री गंगा वलांडून अलीकडे येण्याचें करूं नये. व ही आमची विनंति मनास न आणतां आपण गंगापार व्हाल तर बाईसाहेबांच्या आज्ञेप्रमाणें आह्मास आपल्याशीं लढाई करण्याचा प्रसंग येईल. या सर्व गोष्टींचा विचार

करून गंगा आपण ओलांडित नाहीं असें आश्वासन देत असाल तर आम्ही आपल्या सेवेंत हजर आहोंच.

हें पत्र आल्यावर शाहू महाराज खंडेराव दाभाडे यांची मसलत, कर्तबगारी, इमानदारी व इभ्रत हीं पाहून मोठे संतोषित झाले आणि त्यांनीं लागलीच आपण तुमच्या पत्राचीं उत्तरें श्री० मातोश्रीकडून आल्याशिवाय गंगापार होणार नाहीं असें अभयवचन पाठविलें.

हल्लींच्या काळांत राज्यकारस्थान ह्मणजे लबाडीचा बाजार असाच प्रकार हमेष आढळतो. आमच्या देशांत पूर्वी सल्ला समलती होत नव्हत्या असें मुळींच नसून क्षणोक्षणीं मसलती करण्याचे प्रसंग येत, पण त्या मसलतींत फसवाफसवीचा भाग फारच थोडा असे. वरची शाहू राजाच्या वेळचीही मसलत किरकोळ मसलतींपैकीं होती असें नसून या मसलतीनें मराठ्यांच्या राज्यांत मोठीच उलथापालथ व्हावयाची होती आणि एवढ्या मोठ्या उलाढालीच्या प्रसंगीं देखील आमचे मसलतगार खोट्याकडे वळले नाहींत यावरून आमच्या हिंदुलोकांत व त्यांतही मराठ्यांसारख्या शूर जातींत कपटीपणाचा भाव फारच क्वचित होता असें उघड होतें.

त्याचप्रमाणें हिंदुलोकांस आत्माभिमान, स्वधर्माभिमान, देशाभिमान वगैरे मुळींच नाहीं अशी जी कित्येक लोकांची हल्लीं समजूत होत चालली आहे तीही निरर्थक असावी असें वाटतें. कारण हें दा-

भाडे घराणेंच कां घ्याना? या घराण्यांतील पुरु- षांत जर वरील अभिमान त्रयीपैकीं एकाही अभि- मानाचा गंध नसता तर संभाजी महाराजांच्या आ- रंमापासून तों शाहू महाराजांच्या अखेरीपर्यंत मरा- ठी राज्यांत केवढाले फरक झाले असते याचें वर्णन करणें देखील कठीण आहे. पण एकट्या या दा- भाड्यांनीं आपला अभिमान व आपली इमानदारी दृढनिश्चयानें कायम ठेविल्यामुळें मराठ्यांच्या रा- ज्यांत गडबड न होतां तें शाहु महाराजाच्या अ- खेरीपर्यंत जसेच्या तसेंच कायम राहिलें एवढेंच नव्हें तर दिवसांदिवस त्या राज्याचा उत्कर्षही होत गेला. हेंच त्या वेळच्या हिंदु लोकांत जर आलीकडील लोक ह्मणतात त्या प्रमाणें कोणताच अभिमान नसतां तर त्यांच्या हातून एक तरी अ- सलें कृत्य घडतें काय? खचित् घडलें नसतें असो.

या प्रमाणें शाहु महाराजांचें अभयवचन हातीं आल्यावर खंडेराव दाभाडे व मंत्री मिळून महारा- जांच्या भेटी करितां त्यांच्या गोठांत गेलें. खंडेरावां- नीं महाराज लहानपणीं पुष्कळ आंगा खांद्यावर खेळविलें असल्यामुळें उभयतांचें थोडावेळ भाषण व थोडीशी बैठक होतांच खुणाखाणांवरून हेच शाहु महाराज आहेत अशी दाभाड्यांची खात्री झाली.

शाहु महाराजांनींही दाभाड्यांची आपल्याबद्दल खात्री झाली असें पाहून खंडेरावास आज्ञा केली कीं, तुमची स्वतः जर आमच्या बद्दल खातरजमा

झाली असेल तर मातोश्री साहेबांस हा वृत्तांत कळवून त्यांजकडून दर्शनाची परवानगी आणवावी. म्हणजे त्यांनीं स्वतः पाहिल्यावर त्यांसही संशय रहाणार नाहीं.

अशी शाहु महाराजांची आज्ञा होतांच खंडेराव दाभाडे व मंत्री यांनीं ती गोष्ट मान्य करून ताराबाई साहेबास हे खरे संभाजी महाराजांचे पुत्र शाहु महाराज आहेत अशा अर्थाचीं पत्रें लिहिलीं.

या वेळचा हा काल जरी हल्लींच्या इतका शिकस्त लबाडीचा नव्हता, तथापि त्यावेळीं देखील एकास पळावयास लावून दुसऱ्यास पाठीस लावणारे लोक थोडे होते असें मुळींच नाहीं. हीं दाभाड्यांचीं व मंत्र्याचीं पत्रें ताराबाईच्या हातीं सांपडतांच वरील प्रकारच्या लोकांनीं त्या बाईचें शुद्ध अंतःकरण मलीन करण्याचा उद्योग चालविला ! आणि त्यांचा तो उद्योग बऱ्याच अंशानें सफलही झाला !

त्या आपलपोट्या व विघ्नसंतोषी लोकांनीं हा खरा शाहु नसून तोतया आहे असें ताराबाईच्या मनांत भरवून देऊन तिच्या मनांत राज्यलोभाचाही अंकूर रोंवून दिला. तिचे या प्रकारचे कान भरवून दिल्यावर अर्थात ती जात्या स्त्रीच पडल्यामुळें स्त्रीस्वभावास अनुसरून तिनें खंडराव दाभाडे व पेशवे मंत्री वगैरे मुत्सद्यांस पत्रें लिहून कळविलें कीं, तो शाहुराजा नसून तोतया आहे सबब त्यास तुम्ही पुढें येऊं देऊं नयें !

हीं पत्रें येऊन दाभाड्यांच्या हातीं पडतांच त्यांस मोठा विचार पडला व लागलीच त्यांच्या मनांत आलें कीं, खुद्द बाईसाहेबांच्याच बुद्धीचें हें काम नसून त्यांच्या मनांत हा विपर्यास कोणी तरी भरवून दिलेला असावा. हें मनांत आल्या बरोबर त्यांनीं ताराबाईस उलट लिहून कळविलें कीं, हे संभाजी महाराजांचे पुत्र शाहुमहाराज खास आहेत. आह्मीं यांस पुरतेपणीं ओळखलें आहे. यांच्या आंगावरील सर्व चिन्हें व लहानपणची वागणूक बरोबर जमत असून संशय घेण्यास कोठेंही जागा रहात नाहीं. आपण दुसऱ्याच्या बुद्धीस लागून जर मनांत संशय आणाल तर आमच्या हातुन निमकहरामी मुळींच व्हावयाची नाहीं. जसे आपण धनी तसेच शाहुमहाराजही आम्हास धनीच आहेत. सबब त्याच्यावर आमच्यानें शस्त्र धरवणार नाहीं. या करितां अजूनही जर त्यांच्याबद्दल आपल्या मनांत शंकाच येत असेल तर आपण तशीच आज्ञा करावी, ह्मणजे आह्मास ईश्वर जिकडे बुद्धि देईल तिकडे जाऊन कालक्रमणा करून स्वस्थ बसूं. पुढें आपण व शाहूमहाराज उभयतांही धनीच आहांत तेव्हां हवें तसें करावें; त्यांत आमच्यावर कोणत्याच प्रकारचें दूषण न येतां निमकहरामीचाही डाग लागावयाचा नाहीं.

हा जो खंडेरावाकडून ताराबाईस निरोप गेला तो किती महत्वाचा आहे याचा विचार वाचकांनीच

करावा. इतक्या महत्वाचा निरोप उगीच पाहिजे त्या जासूदाबरोबर पाठविणें रास्त नाहीं. असें दाभाडे यांनीं मनांत आणून आपल्या पदरच्या नासूदावरीळ मुख्य नाईक पिलाजी गाइकवाड नांवाचा विश्वासु व हुषार मनुष्य होता त्याजपाशीं वरील मतलबाचें पत्र देऊन ताराबाईसाहेबांस मुखजबानीनें हा सर्व मजकूर विदित करण्यास आज्ञा देऊन पिलाजीस पन्हाळा किल्ल्यावर रवाना केलें, आणि अमुक दिवसांच्या मुदतींत या पत्राचा जबाब घेऊन तुला परत आलेंच पाहिजे ह्मणून त्यास ताकीद केली.

या ठिकाणीं पिलाजी गायकवाड याच्या संबंधानें दोन शब्द लिहिणें रास्त आहे, असें वाटल्यावरून तेवढें काम उरकून नंतर आपण आपल्या मुख्य विषयाकडे पुनः वळूं. पिलाजी गायकवाड हा खंडेराव दाभाडे सेनाखासखेल यांच्या पदरचा एक जासूद होता हें वर सांगितलेंच आहे. हा जासूद हुषार, बुद्धिवान व चलाख असल्यामुळें दाभाड्यांच्या घराण्याची याच्यावर मोठी मेहेरबानी बसली. आणि त्याच गुणांवरून दाभाड्यांनीं यास मोठमोठ्या अधिकारांचीं कामें सांगून त्याला आपला कुलमुखत्यार केला. कुलमुखत्यारीची अखेर येथपर्यंत येऊन पोंचली कीं, पिलाजीचे यजमान हातावर शीर घेऊन मुलुखगिरी करून मुलुख मिळविणारे खरे सुबीर दाभाडे सेनापति सांदोरीस राहून स्वतःचा नोकर गायकवाड हाच यांनीं मिळविलेल्या मुलखाचा आ-

धिपति बनला! या गोष्टीचा दाखला पाहण्यास आपल्यास फार लांब जावें लागत नसून हल्लीं बडोद्याचे गायकवाड व तळेगांवचे दाभाडे यांच्या वंशाकडे पाहिलें ह्मणजे सर्वांची सहज खात्री होणार आहे.

बडोद्याचे राज्याधिपति गायकवाड हे तळेगांवच्या दाभाड्यांचे जासूद आहेत, गायकवाडास या स्थितीस आणण्यास दाभाडे कारणीभूत आहेत. गुजराथचें सर्व राज्य दाभाड्यांनीं मिळविलेलें आहे. ज्या बडोदेकर गायकवाडांची सत्ता आज कोट्यावधि प्रजेवर चालत आहे, ते बडोदेकर गायकवाड खरे मालक नसून तें सर्व राज्य दाभाड्यांच्या मालकीचें आहे, बडोदेकर हे अनाधिकारी असून आपले यजमान दाभाडे यांच्याशीं निमक हरामी करून त्यांनीं राज्य संपादन केलें आहे. वगैरे गोष्टी जर कोणी जगास सांगूं लागेल तर उभय कुलांच्या सद्यस्थितीकडे पाहून या गोष्टी खऱ्याच संभवनीय आहेत असें कोणी तरी ह्मणेल काय? पण त्या नुसत्या संभवनीय नसून खरोखरी घडलेल्या आहेत असें जर इतिहासावरून सिद्ध करून दिलें, तरी त्याचा या कालांत उभय कुलांस थोडा तरी उपयोग होणार आहे काय? पण आपण या कल्पना तरी मनांत कशाला आणाव्या! पण उपयोग न झाला तरी जगास या कुळांची खरी हकीगत समजेल व त्या हकीगतीपासून ज्या कोणास जो जो लाभ

करून घ्यावयाचा असेल तो तो लाभ ते लोक करून घेतील हा फायदा तरी काय लहान आहे ?

आज बडोदेंकर गायकवाड पाहिलें ह्मणजे त्यांस इंग्रज सरकारांसारखे मी मी ह्मणणारे राजेही मान सन्मान देत आहेत. गायकवाडांची त्यांच्या राज्यांत बोलबाला आहे यांत फारसें नवल नाहीं, पण त्यांची स्वारी बाहेर प्रदेशीं फिरावयास गेली तरी इंग्रजांसारख्यांची प्रजा देखील आपल्यास बडोदेकर महाराजांचें नुसतें दर्शन तरी होईल काय ह्मणून जिभाचाटीत असते ! पण हा सर्व प्रभाव कोणाचा ? हा सर्व मान मरातब कोणाचा असून यांच्या स्वाधीन तो कोणी केला ? असा जर कोणी इतिहासज्ञानें प्रश्न केला तर त्यास उत्तर दाभाड्यांकडेच बोट दाखवून मिळावयाचें !

परंतु हे या गुजराथचे खरे यजमान दाभाडे आज मित्तीस पुण्यापासून दहा बारा कोसांवर तळेंगांव ह्मणून खेडें आहे तेथें राहून आपली वतनवाडीं बघत आहेत. ते कोठें आले किंवा गेले तरी त्यांचा कोणास पत्ताही लागत नाहीं. त्यांची स्वारी पुण्यास आली तर त्यांच्या स्नेहा सोबत्यांशिवाय कानाच्या कोनास देखील कळत नाहीं ! त्यांस एखाद्या यःकश्चित अंमलदारास भेटावयाचें असल्यास दाभाडे हे कोण आहेत हें समजून घेण्याकरितां इनामदारांची यादी उलथी पालथी करावी लागते ! फार काय सांगावें ? पण यांच्याच गांवांतील फाटक्या

तुरकच्या लोकांनीं जर यांच्याशीं खावदाव केला तरी देखील यांस एखाद्या क्षुल्लक कामदाराकडे इतर रयतेप्रमाणें दाद मागावयास जावें लागतें ! !

तर खुद्द यजमान दाभाडे यांची अवस्था अशी असून त्यांच्या पदरच्या पिलाजी जासुदाच्या वंशानें राज्योपभोग घ्यावा असा प्रकार होण्यास कोणतें कारण असावें बरें ? इतर कारणांचा आपण विचार करण्यापेक्षां "हें कालमहात्म्य" आहे एवढेंच ह्मणून मनाचें समाधान करून घेणेंच योग्य ठरतें नाहीं बरें ? असो. आज आपण तसेंच समाधान करून घेऊन आपल्या कामास लागूं.

याप्रमाणें खंडेराव दाभाडे यांनीं पिलाजी जासूद यांजपाशीं पत्रें देऊन त्यास पन्हाळ्यावर रवाना केलें. तो पन्हाळ्यास येऊन दाखल झाल्यावर त्यानें श्री. ताराबाईस पत्र देऊन मुखजबानीही सर्व हकीगत निवेदन केली.

ती सर्व हकीगत ऐकून ताराबाईनें विचार केला कीं, दाभाडे हे पूर्वीपासून एकनिष्ठसेवक आहेत. त्यांच्या हातून गादीचें कधींही वाईट होणार नाहीं. आणि लोकांच्या सांगीवरून त्यांच्याशीं वाकून राहूनही चालावयाचें नाहीं. याकरितां त्यांचें शाहु राजाच्या संबंधानें जसें मानस असेल त्याच बेतानें आपणही त्यास रुकार भरून शाहुराजास इकडे बोलवावा हेंच ठीक आहे. असा विचार मनांत आणून ताराबाईनें निरोप घेऊन येणारा

पिलाजी जासूद यास पत्रें व मुखजबानी असे निरोप दिले कीं, तुमची शाहुराजाच्या खरेपणाबद्दल खात्री झालीच आहे. सबब पत्र पावतांच त्यानला योग्य सन्मानानें इकडे खुशाल घेऊन यावें.

हीं पत्रें व हा निरोप घेऊन पिलाजी गायकवाड नाशिक मुक्कामीं सांगितलेल्या मुदतींत येऊन हजर झाला.

पिलाजीनें हें काम मोठ्या हुषारीनें व चपलतेनें केलें असें पाहून खंडेराव दाभाडे सेनाखासखेल यांनीं खुष होऊन पिलाजी गायकवाडास पागेचीं वस्त्रें देऊन त्याला ५० स्वारांवर मुख्य नेमिलें. येथूनच गायकवाडाच्या घराण्याचें बीं रुजलें जाऊन त्यांनीं आपल्या हुषारीवर व मसलतीवर आपला वेलविस्तार करून घेतला. अस्तु.

ताराबाईचीं पत्रें घेऊन हातीं पडतांच खंडेराव दाभाडे यांनीं श्री-शाहुमहाराज यांजकडे जाऊन विनंति केली कीं, आपण पन्हाळयास चलावें अशी बाईसाहेबांची आज्ञा झाली आहे.

संभाजी महाराज हे थोरल्या महाराजांचे वडील चिरंजीव असून त्यांचेच औरस पुत्र शाहुमहाराज असल्यामुळें मराठ्यांच्या गादीचा अधिकार पूर्णपणें शाहुमहाराजांसच होता हें जरी खरें आहे, तथापि राज्यलोभ कोणास सुटावयाचा नाहीं हें लक्ष्यांत आणून शाहुमहाराजांच्या मनांत ताराबाईच्या संबंधानें अर्थातच शंका उत्पन्न झाली, व

त्या शंकेचें निवारण करून घेण्याकारितां त्यांनीं दाभाडे प्रभृति मंडळींशीं बोलणें सुरू केलें.

शाहुमहाराज ह्मणाले, आह्मी वडील घराण्यापैकीं असल्यामुळें राज्यावर पूर्ण हक्क आमचा आहे. माझ्या मागें तुह्मीं सर्वांनीं राज्यभार वाहिला, त्याजबद्दल मी तुह्मां सर्वांचा आभारी आहें. मी स्वतः आतां राज्यकारभार बघावयास आलों आहें. तेव्हां न जाणो श्री० मातोश्री ताराबाईसाहेबांच्या किंवा तुह्मां सरदारांच्या मनांत विकल्प उत्पन्न होणार नाहीं ह्मणून कशावरून ? तुह्मी मला आईसाहेबांची आज्ञा निवेदन केली ती ठीकच आहे, पण त्यांच्या आज्ञेनुसार मी आज तुमच्या बरोबर विश्वासानें आलों, आणि तेथें गेल्यावर जर दगाफटका झाला, तर त्याची जबाबदारी कोण घेणार ?

हें महाराजांचें बोलणें ऐकून आमचे बहादर खंडेराव सेनापति पुढें सरसावले; आणि छातीस हात लावून त्यांनीं पुढीलप्रमाणें महाराजांशीं बोलण्याची सुरुवात केली.

खंडेराव ह्मणतात, " सरकार हा देह आजपर्यंत आपल्याच अन्नानें वाढला आहे. वाडवडिलांनींही गादीची सेवा एकनिष्ठपणानें केलेली आहे. आजपर्यंत खावंदांच्या पायाचे पुण्याईनें आजन्मांत खोटें भाषणाची संवय नाहीं. तोंडांतून गेलेला शब्द खरा करण्याकडे जितकें लक्ष्य आहे तितकें जीव

पोंचविण्याकडे देखील नाहीं. आजमित्तीपर्यंत हें व्रत ईश्वरानें कायम ठेविलें आहे, तर आज अन्न दात्या सरकारास प्रतिज्ञा पूर्वक सांगतों कीं, सरकारांनीं पन्हाळ्यास येण्याबद्दल आईसाहेबांची आज्ञा झाली आहे, त्याप्रमाणें खुशाल चलावें. आह्मी पिढीजादे एकनिष्ठ सेवक आहों. आमच्या हातून दगाफटका स्वप्नांत देखील व्हावयाचा नाहीं, पण कदाचित् मातोश्री साहेबांच्या मनांत विकल्प येईल अशी सरकारच्या मनांत शंका असल्यास इतकेंच सांगतों कीं, पन्हाळ्यास जाऊन मातोश्री साहेबांचें दर्शन झाल्यावर मग कांहीं विपर्यास दिसेल तर ज्या मुक्कामीं आज स्वारी आहे त्या मुक्कामापर्यंत सुरक्षितपणें पोंचविण्याची हामी मी आपल्या शिरावर घेतों. आईसाहेबांचें व आपलें न पडेल तर आपण स्वस्थपणें या मुक्कामापर्यंत माघारें यावें. खावंदांबरोबर हा दासही हजर राहील आणि स्वारी नाशिकापर्यंत पोंचली ह्मणजे मी मोकळा होऊन जिकडे वाट फुटेल तिकडे चालता होईन. मग सेवा मात्र व्हावयाची नाहीं. हें मी छातीस हात लावून प्रतिज्ञेनें सांगतों, याच वेळीं धन्याच्या पायांपाशीं एक विनंति व कीं, सरकारच्या मागें श्री० ताराबाई साहे राज्याचें संरक्षण काया वाचा मनें करून आहे त्यांच्या हातून दगा फटका होण्याची देखील बोलावयास नको, पण स्वामींनीं त्य

आज्ञेप्रमाणें चालेन असें शफ्तपूर्वक सांगावें ह्मणजे आह्मां सर्व सेवकांचीं मनें निर्धास्त होऊन संतोषित राहतील.

सेनापति दाभाडे यांचें हें भाषण ऐकून शाहू महाराजांस समाधान वाटलें, आणि आतां दगा फटका होण्याची बिलकुल धास्ती राहिली नाहीं अशी त्यांनीं आपल्या मनांत पक्की गांठ मारून दूधभात, गंगा तुळशी व बेलभंडार यावर हात ठेवून "तुह्मी पुरातनपासून एकनिष्ट सेवा करीत आलां आहां, याकरितां तुमच्या ह्मणण्याबाहेर मी बिलकुल नाहीं" असें प्रतिज्ञापूर्वक सांगून तुह्मीही शफथ घ्यावी ह्मणून दाभाडे यांस त्यांनीं आज्ञा केली.

ती आज्ञा होतांच दाभाडे सेनापति यांनीं ही शफत केली कीं "आह्मास आपण व ताराबाई साहेब उभयतांही धनीच आहांत. सबब आपली व आईसाहेबांची भेट होऊन त्यांत जर कोणी गैरवाका समजविल्यामुळें बाईसाहेबांच्या मनांत विपर्यास उत्पन्न होईल, तर आह्मी आपल्यास या मुक्कामापर्यंत आणून पोंचते करूं. मुक्कामीं आल्यावर पाहिजे तसा प्रकार आपण खुशाल करावा. मी मात्र उभयतांपाशींही न रहातां ईश्वर बुद्धि देईल तिकडे निघून जाईन हें आमचें व्रत ठरलें."

याप्रमाणें उभयतांच्याही आणाभाका झाल्यावर सन १७०८ झालीं श्री. छत्रपति शाहूमहाराज नाशिकाहून निघून पन्हाळ्यास आले.

पन्हाळ्यास आल्यावर ताराबाईसाहेबांची व त्यांची गांठ भेट होऊन हेच शाहु राजे अशी तिच्या मनाचीही बालंबाल खात्री झाली. नंतर सर्व मराठे मंडळीस मिळून एक भली टोलेजंग मेजवानी दिली आणि त्या मेजवानीच्या समारंभांत श्रीमंत मातुश्री ताराबाईसाहेब व श्रीमंत छत्रपती शाहुमहाराज यांचें एका ताटांत झालेलें जेवण पाहून तर राज्यांतील सर्व लोकांची शाहूमहाराजांबद्दल पुरी खात्री होऊन चुकली.

ताराबाईसाहेबांच्या व शाहूमहाराजांच्या संमतीनें राजाराम महाराजांचे चिरंजीव संभाजी राजे, यांची वारणेपर्यंत हद्द ठरवून देऊन त्यांस कोल्हापुराकडील मुलूख दिला. ( सन १७११ ) खंडेराव दाभाडे हे सर्व राज्याचे पूर्वीपासूनचे पुरे माहीतगार असल्यामुळें शाहू महाराजांनीं मुद्दाम त्यांस आपलेकडे मागून घेतलें व तेव्हांपासून श्रीमंत शाहू महाराज राज्यकारभार सुरक्षीतपणें पाहूं लागले.

शाहू महाराज राज्यकारभार चालवीत असतां खंडेराव दाभाडे सेनापतींचा राज्यकारस्थानीपणा हुषारी व एकनिष्टपणें सेवा पाहून महाराज फारच खुष झाले आणि दाभाड्यांवर त्यांची सोळा आणे मर्जी बसली.

श्री० शाहू महाराजांचे चुलते राजाराम महाराज यांच्या कारकीर्दींत दाभाड्यांची सनद मिळाली होती ती त्यांच्या वेळच्या मुसलमानांच्या दंग्यांत कोठें गहाळ झाली होती. ती पाटिलकीच्या वगैरे

वतनाची सनद आपल्यास पुनः मिळावी ह्मणून एके वेळीं दाभाड्यांनीं महाराजांस विनंती केली. त्या विनंतीस मान्य होऊन महाराजांनीं सेनापतीस त्यांची पूर्वीची सनद तर दिलीच; पण त्या खेरीज राजशक ३६ ह्मणजे इ० सन १७१० त चाकण तालुक्यांतील इंदुरी गांव पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें इनामही करून दिला, त्याचप्रमाणें चाकण तालुक्यांतील ६० गांवाची व पारनेर परगण्यांतील १०४ गांवाची सरदेशमुखी दर शेंकडा * दोहोत्र्याप्रमाणें व सर्व फंड फर्मास याचीही सनद वंशपरंपरेनें करून दिली.

याप्रमाणें शाहू महाराजांच्या प्रथम कारकीर्दींत दाभाडे सेनापती यांनीं महाराजांची मर्जी सुप्रसन्न करून घेतली. या वेळेपर्यंत दाभाड्यांचें सर्व शहाणपण व कर्तबगारी घरच्या घरींच दिसून आली व या वेळेपर्यंत त्यांस मुलूखगिरीचें कामही पडलें नव्हतें. व जें पडलें होतें तें केवळ शिवाजी संभाजी व राजाराम महाराजांच्या धांदलींत पडलें होतें. परंतु दाभाड्यांस स्वतंत्रपणें मोहीम करण्याची पाळीच आलेली नव्हती.

---

* फंडफर्मास याचा अर्थ कदाचित् वाचकांस समजणार नाहीं याकरितां सांगतों कीं, पूर्वी प्रत्येक ठिकाणच्या शेतांत जें पीक व जो माल तयार होईल त्या पिकाचा किंवा त्या मालाचा मासला सरकारांत द्यावा लागत असे. व सरकारचा तो एक हक्कच होऊन गेला होता. तो सरकारचा हक्क महाराजांकडून सेनापतीस मिळाला होता,

खंडेराव दाभाडे सेनापति यांच्या संबंध हकीगतीचे जेथें आह्मी खंड पाडले आहेत तेथें मराठ्यांच्या संबंध राज्याचा इतिहास करणारासही खंडच पाडावे लागतील, अशी त्या वेळेस चमत्कारिक स्थिति होती. मूळ शिवाजी महाराज यांचे दिवस कोणत्या धांदलीत गेले असतील याची वाचकांनीं नुसती कल्पनाच करावी हें चांगलें. पुढें महाराजांच्या मागें संभाजी राव राज्याधिपति झाले, पण त्यांचा सर्व अवतार राज्याच्या उलाढालींत किंवा कारस्थानांत संपला नसून शिकारींत, ऐष आरामांत, चैनींत व नानाप्रकारच्यां छंदांत गेला असून त्यांची अखेर तर किती भयंकर झाली, हेंही सर्व श्रुतच आहे. त्यांच्या मागें राजाराम महाराज गादीवर आले. पण संभाजी रावांच्या वेळीं जी अव्यवस्था व बखेडे माजले, त्यांच्या योगानें महाराजांचे देव देव्हाऱ्यांत कधींच बसले नाहींत. त्यांस मांजराच्या पिलांप्रमाणें वरचेवर स्थलांतर मात्र करावें लागलें व त्यांची अखेर देखील अशाच स्थितींत झाली असें ह्मणण्यास प्रत्यवाद दिसत नाहीं. राजाराम महाराजांच्या पाठीमागें तर बोलून चालून बायका मुलांशींच गांठ होती. यावरून थोरले शिवाजी महाराजांचा अवतार संपल्या तारखेपासून शाहु महाराजांचा उदय दक्षिणेंत होईपर्यंत जो काल गेला तो मराठे लोकांचें संपादित जेवढें राज्य आहे तेव्हडें तरी कायम रहातें कीं नाहीं याच फिकिरींत गेला असें उघड

म्हणावें लागतें. शाहुमहाराज गादीवर बसल्यावर मात्र जिकडे तिकडे स्वस्थता होऊन मराठ्यांस आपली नजर जरा लांबवर पोंचविण्यास आवधी सांपडली. खुद्द राजांच्या मागेंच जर स्वसंरक्षणाचा ससेमिरा लागला होता तर आमच्या खंडेरावासारख्या रणशूर व एकनिष्ठ पुरुषास तरी परराज्य काबीज करण्याचा प्रसंग कोठून येणार? अर्थात तसली युद्ध कलाप्रवीण मंडळी देखील आजपर्यंत स्वस्थ घरीं बसूनच होती.

शाहुमहाराजांस राज्याभिषेक होऊन थोडे दिवस लोटल्यावर मराठ्यांच्या राज्यांत एक बरीच मोठी गोष्ट घडून आली. वस्तुतः पाहिलें तर ती गोष्ट ह्मणण्या इतकी महत्वाची नसावी हें खरें, तथापि ती गोष्ट खरोखरीच क्षुल्लक असतां पुढें तीच मोठीशी भासूं लागली! ती महत्वाची गोष्ट एवढीच कीं, या वेळीं शाहुमहाराजांच्या पदरचे पेशवे पिंगळे यांजवर महाराजांची खप्पा मर्जी होऊन त्यांच्या जागीं बाळाजी विश्वनाथ भट या नांवाच्या गृहस्थाची नेमणूक झाली.

बाळाजी विश्वनाथास पेशवे हें पद सन १७१४ सालीं प्राप्त झालें व याच वेळीं पुनः शाहुमहाराजांनीं खंडेराव दाभाडे यांस सेनाखासखेलचें पद मोठ्या आनंदानें दिलें. या वेळीं दक्षिणेंत आलेला औरंगजेब मरून बरेच दिवस ह्मणजे सात वर्षें झालीं होतीं व त्याच्या मागें दिल्लीस बरेच

बखेडेही उत्पन्न झाले होते. शिवाय मराठ्यांच्या राज्याकडे नुसत्या वांकड्या डोळ्यानें बघणारा दे-खील दक्षिणेंत कोणी प्रबळ असा उरला नव्हता. त्याचप्रमाणें शाहुमहाराजांच्या पदरीं खंडेरावासा-रखे किंवा बाळाजी विश्वनाथासारखे बहादूर शिपाई होते. अशा स्थितींत मराठ्यांच्या राज्याचा ओघ ज्या वेळीं तो आपल्या स्वाभाविक गतीनें आला त्या वेळीं असा पुळपुळीत कोण मराठा असेल कीं, आपली तयारी परराष्ट्रावर न करितां आपल्या रणधीर लोकांस माशा मारीत घरांत बसवील; शाहुमहाराजांनीं तरी अशा संधीस आपल्या दा-भाडयास व पेशव्यास बोलावून आणून दोघांसही स्वारी करण्याच्या दोन दिशा दाखवून बाहेर पड-ण्याची आज्ञा दिली.

आतांपर्यंत आमच्या दाभाड्यांचा स्वतंत्र युद्ध प्रसंग कोणाच्याच दृष्टीस पडला नव्हता, पण आतां तो प्रसंग पाहण्याचाही वेळ आला अस-ल्यामुळें सर्वांनीं एकचित्त होऊन तो प्रसंग ऐ-कावा. त्या प्रसंगाची सविस्तर हकीगत पुढील भागांत आमच्या वाचकांस सांपडणार आहे.

# भाग चौथा

## खंडेराव दाभाडे सेनापति-उत्तरार्ध.

शाहु महाराजांनीं आपल्या राज्यांत स्वस्थता झालेली पाहून आपल्या पदरच्या दाभाडे सेनापती व बाळाजी विश्वनाथ पेशव्यास मोहिमेस जाण्याची आज्ञा केली, हें मागील भागांत सांगितलेंच आहे. त्यांत शाहु महाराज दिल्लीहून सुटण्याचे वेळीं औरंगजेब बादशहाच्या शहाजादीशीं अशी प्रतिज्ञा भोगून आले होते कीं, मी स्वदेशीं जाऊन आपल्या पूर्वजांच्या राज्यपदारूढ झाल्या बरोबर खुणेकरितां ह्मणून दिल्लीची लूट करवीन! त्याप्रमाणें ते राज्यारूढ झाल्यावर त्यांनीं थोड्याच दिवसांत बाळाजी विश्वनाथ यास दिल्लीची मोहीम सांगितली व बाळाजी विश्वनाथ तिकडे निघूनही गेले. तसेंच खंडेराव दाभाडे यांस गुजराथेंत जाऊन प्रांत मिळविण्यास आज्ञा दिली ( सन १७१८ इ. )

शाहु महाराज दिल्लीहून परत येत असतां त्यांस वाटेनें कांहीं गुजराथचा भाग अनायासेंच पहाण्यास सांपडला होता. त्या प्रसंगीं तो भाग त्यांस मोठा सुपीक व सघन असा भासला आणि पुढें मागें हा भाग आपण आपल्या ताब्यांत घ्यावा अशी त्यांस तेव्हांच इच्छा झाली होती, आणि याच कारणानें

त्यांनीं त्या मुलखावर स्वारी करण्याकरितां सेनापति दाभाडे यांस आज्ञा केली.

दाभाडे यांनीं आज्ञा होतांच पिलाजी गायकवाडास बरोबर घेऊन गुजराथच्या मोहिमेस प्रयाण केलें. या वेळीं मुसलमान लोकांत कोणाचा पायपोस कोणाच्या पायांत नसल्यामुळें दाभाडे यांस सुरत अठ्ठाविशीपर्यंत फारसा अडथळा झालाच नाहीं. दाभाडे यांनीं खानदेशांतून सुरत आठ्ठाविशी पर्यंत मोहीम करून वर्षाखेर झाल्यावरून ते साताऱ्यास महाराजांच्या दर्शना करितां परत आले.

खंडेराव दाभाडे यांचा या मोहिमेंत खुद्द गुजराथेंत जरी जारी अंमल बसला नाहीं, तथापि गुजराथ व खान देश यांच्या दरम्यान त्यांनीं आपले लोक ठेवून आपला अंमल जारी बसविला होता. या मोहिमेंत त्यांस पिलाजी गायकवाड याची हुषारी व एकनिष्ठ सेवाही पहाण्यास सांपडली व त्याच्या गुणानें सेनापति दाभाडे खुष होऊन त्यांनीं त्यास शिलेदारीचीं वस्त्रें देऊन पांच हजार स्वारांचें स्वतंत्र पदक करून दिलें.

इतक्यांत शाहु महाराजांच्या हेतु प्रमाणें दिल्ली लुटण्याचा तोडगा करून बाळाजी विश्वनाथ पेशवाही साताऱ्यास परत आला. या उभयतांच्या दोन्हीही मोहिमी व्हाव्या तशा झणझणीत झाल्या नाहींत हें उघडच दिसतें.

याच संधानांत दिल्लीस एक मोठी फेरबदल

झाली. या प्रसंगी दिल्लीच्या तक्तावर फेरुकशहा नांवाचा बादशहा बसला होता. हा बादशहा दो- घां सैयद बंधूंच्या आश्रयानें तक्तनशीन झाला हो- ता. बादशहास या दोघां सयदांचे उपकार स्मरून त्यांच्या कह्यांत आपणास वागावें लागेल ही धास्ती पडून त्यानें या दोघां भावांची जोडी फोडण्याची मसलत योजली. या मसलतींत दोघांभावांपैकीं सै- यद हुस्सेन अल्लीखान नांवाचा जो भाऊ होता, त्यास दक्षिणेचा अधिकारी करून इकडे रवाना केलें.

सैयद हुसेन अल्लीखान यास दक्षिण प्रांताचा अधिकारी करण्यापूर्वी दक्षिणेंत दाउदखान नांवाचा इसम बादशहाच्या तर्फेनें अधिकारी होता. अल्ली खानांची त्याच्या जाग्यावर नेमणूक करतांना दाउ- दखानास गुजारथ प्रांताचा अधिकार बादशहानें दिला होता.

बादशहाच्या मनांत सैयद हुसेन याची दक्षिणेंत डाळ शिजूंनये असें फार होतें व त्या करितां त्यानें दाऊदखान यास गुप्तरूपानें असें कळविलें होतें कीं, सैयदास कोणत्याही प्रकारें दक्षिणेचा अधि- कारी होऊं देऊं नये. त्या प्रमाणें दाउदखानानें सैयदास लढाई करून अडथळा केला. पण सैयदाच्या फौजेचाच अखेरीस जय झाल्यामुळें त्यानें आपला अंमल दक्षिणेंत बसविण्याचा क्रम सुरू केला.

त्यानें गुजराथ वळांडून खानदेशांत पाऊल ठेविलें तोंच त्याला खंडेराव दाभाड्यांचे लोक प्रथम भेटले. सैयद हा आपल्या लोकांवर चालून येत आहे अशी बातमी लागतांच खंडेराव दाभाडे साताऱ्याहून निघून खानदेशांत आले.

दाभाड्यांच्या लोकांवर हल्ला करणारी सैयदाची फौज सुमारें आठ हजारांवर होती. दाभाड्यांनीं आपल्या आंगच्या युद्ध कौशल्यानें सैयदाचे लोक हल्ला करतातसे पाहून त्यांस आंगावर घेण्याकरतां प्रथम पळ काढल्यासारखें केलें आणि सैयदाचे लोक पाठलाग करीत अडचणीच्या ठिकाणीं आले, असें पाहून दाभाड्यांनीं आपल्या फौजेस उलटण्यास सांगून सैयदाच्या फौजेचा तेथेंच चुराडा केला. याप्रमाणें या लढाईंत खंडेराव दाभाडे विजयी होऊन कांहीं दिवस तिकडेच राहिले.

सैयदानें खंडेराव दाभाडे यांचा जोर व युद्ध करण्याची कुशलता पाहून आपला मोहोरा फिरविला आणि खानदेश सोडून देऊन त्यानें अहमदनगरची वाटधरली.

सैयद हा तोंड चुकवून खानदेशांतून अहमदनगराकडे वळला, ही बातमी खंडेराव दाभाडे यांस कळतांच त्यांनींही आपला मुक्काम उठवून अहमदनगराकडे कुच केलें आणि सैयद हुसेन अल्लीखान यास पुनः अहमदनगरास गांठून त्याचीं हाडें इतकीं

मोडून टाकलों कीं त्या बिचाऱ्यास पुनः मान वर करण्यास ताकदच राहिली नाहीं !

सैयदाच्या फौजेवर दाभाड्यांचे जे हे दोन जय झाले, त्यामुळें सर्व देशभर मराठे लोकांचा वचक बसून त्यांस सर्व लोक मानूं लागले. सैयद तर बिचारा हतवीर्य होऊन आपण मराठ्यांशीं कोणत्या तरी उपायानें सल्ला करावा असा विचार करूं लागला.

अहमदनगराची फत्ते केल्यावर खंडेराव दाभाडे श्रीमंत छत्रपतीस भेटण्याकरितां साताऱ्यास आले. सेनापति दाभाडे यांचें हे दोन ठिकाणचे अलौकिक कृत्य पाहून शाहू महाराज फारच सुप्रसन्न झाले, आणि त्यांनीं खंडेराव दाभाडे यांस लागलीच सेनापतीचीं वस्त्रें देऊन पूर्वींचा सेनापति मानसिंग मोरे यास कमी केलें. ही गोष्ट सन १७१६ त घडली. या वेळेपर्यंत दाभाड्यांच्या घराण्यास नुसती पदवी मात्र होती, पण आतां वस्त्रें मिळून सेनापतीचें कामही खंडेराव दाभाडे करूं लागले.

पुढें दोन वर्षें बरीच शांततेनें गेलीं- या अवधींत बादशहाकडून आलेला सैयद मराठ्यांशीं सल्ला कशा रीतीनें करावा याचा विचार करीत होता. तों त्यास एक सुरेख युक्ति सुचली.

शंकराजी मल्हार ह्मणून त्याच्याजवळ एक कारकून होता. हा गृहस्थ पूर्वीं थोरल्या शिवाजी महाराजांजवळ कारकून असून राजाराम महाराजांच्या वेळीं सचीव पदापर्यंत चढला होता. परंतु

राजाराम महाराज ज्यावेळीं जिंजीस गेले, त्या वेळीं तो काशीवास करण्याकरितां ह्मणून निघून गेला. परंतु ज्याच्या हातून राज्याची उलाढाल कधीं तरी झालेली आहे, त्यास वृद्धापकाळीं देखील स्वस्थ बसवावयाचें नाहीं, हा जो स्वाभाविक नियम आहे, त्यास अनुसरून या शंकराजी मल्हारासही वाराणशी क्षेत्रीं चैन पडेना. सैयद हुसेन हा दिल्लीहून दक्षिणेंत येत आहे हें त्यास समजतांच त्यानें त्याच्याच बरोबर कुच केलें व सैयदाजवळ कारकून वेशानें राहिला. त्यास मराठ्यांच्या दरबारची सर्व माहिती होती, सबब सैयदानें त्यालाच पुढें करून शाहू महाराजांशीं तहाचें बोलणें लाविलें.

शाहू महाराजांनीं सय्यदाच्या ह्मणण्याप्रमाणें तह करण्याचें कबूल करून तहनाम्यांत बराच मुलुख आपल्या ताब्यांत करून घेतला व बादशाही अमलांतही सरदेशमुखी सारखे कांहीं हक्क मिळवून घेतले. हा सर्व तह खंडराव दाभाडे सेनापति व बाळाजी विश्वनाथ पेशवे यांच्या सल्ल्यानें झाला होता.

सय्यदाच्या बद्दल फेरूकशहा बादशहाच्या मनांत वांकडें होतेंच. सैयदानें जेव्हां हा तह बादशहाकडे पाठविला त्या वेळेस बादशहास खंडेराव दाभाड्यानें सैयदाचा पराभव केला हें ऐकून बादशहास परम संतोष वाटला आणि सैयदानें ठरविलेला तहनामा बादशहानें नापसंत केला. हें बादश-

ह्याचे कृत्रिम पाहून सैयद हुसेन अल्लीखान यास राग येऊन त्यानें मराठ्यांच्या साह्यानें फेरूकशहास पदच्युत करण्याचा निश्चय केला.

मुसलमान लोकांत अशी फाटाफाट व्हावी हें मराठ्यांस इष्टच होतें. ह्मणून सैयदानें ज्यावेळीं बादशहास पदच्युत करण्याची गोष्ट शाहू महाराजांजवळ काढली, त्या वेळीं शाहू महाराजांनीं या गोष्टीस आपण साह्य करूं ह्मणून मोठ्या आनंदानें कबूल केलें आणि लागलींच खंडेराव दाभाडे सेनापति आणि बाळाजी विश्वनाथ पेशवे यांस सयदाबरोबर दिल्लीच्या मोहिमेस जाण्याची आज्ञा केली.

शाहुमहाराजांच्या आज्ञेप्रमाणें सन १७१९ सालीं खंडेराव दाभाडे व बाळाजी विश्वनाथ हे सैय्यदहुसेन अल्लीखान यांजबरोबर दिल्लीच्या मोहिमेवर चालते झाले.

खंडेराव व बाळाजी हे उभयतां दिल्लीस जाऊन पोंचल्यावर सय्यदानें यांच्या साहायानें बादशहास पकडून ठार मारलें. या बादशहाला मारल्या नंतर सुमारें सात महिन्यांच्या अवकाशांत दिल्लीस आणखी दोन बादशहा तक्ताबर बसुन पदच्युत झाले ! अखेरीस सुलतान माजुम याचा नातु महमदशहा यांस सैय्यदानें दामाडे आणि पेशवे यांच्या मसलतीनें तक्ताधिपति केलें. या वेळेपर्यंत खंडेराव दाभाडे सेनापति व पेशवे यांचा मुक्काम दिल्लींतच होता.

महमदशहा तख्तावर बसल्यानंतर दिल्लीस ब-रीच स्वस्थता झाली. हें पाहून खंडेराव दाभाडे सेनापति व बाळाजी विश्वनाथ पेशवे ह्यांनीं मसलत करून परत राजदर्शनास येण्याचा निश्चय केला. त्या वेळीं उभयतांनीं मिळून पूर्वीं ठरल्याप्रमाणें चौथ, सरदेशमुखी व स्वराज्य यांच्या सनदा बादशहापासून घेऊन वऱ्हाड, गुजराथ व माळवा यांच्या खंडणीच्या सनदांबद्दल आपला वकील दिल्लीदरबारांत ठेवून स्वारीचा सर्व खर्च घेऊन सेनापति व पेशवे उभयतांही बादशहाचा हुकूम घेऊन देशीं येण्यास परत फिरले. आणि वाटेंत जे मराठ्यांचे मुलूख होते त्यांचा बंदोबस्त करून व आपला अम्मल जारी बसवून ते उभयतांही साताऱ्यास येऊन दाखल झाले.

तिकडे दिल्लीस दोघां सय्यद भावांच्या मसलतीनें राज्यकारभार चालला होता. त्यांनीं दिल्लीदरबारांतील बहुतेक सरदार आपलेसे करून घेतले होते. परंतु त्यांतच एक निजामउल्मुल्क ह्मणून बडा मुत्सद्दी व कारस्थानी सरदार होता तो मात्र यांच्या काबूंत सांपडला नाहीं.

हा निजामउल्मुल्क जात्या हुषार व धोरणी असल्यामुळें दिल्लीस जोंपर्यंत धांदल सुरू होती तोंपर्यंत स्वस्थ बसून राहिला होता, परंतु दिल्लींतील धांदल संपल्या बरोबर तो ज्या अधिकारावर होता त्या अधिकारावर तो स्वतंत्रपणानें वागूं लागला;

आणि या दोघां सय्यद भावांचा मनापासून द्वेषही करूं लागला.

निजाम उल्मुल्क आपल्या कह्यांत वागत नाहीं असें पाहून सय्यदांनें आपली बरीच फौज त्याच्यावर रवाना केली, पण त्या फौजेचा निजाम उल्मुल्क यानें पराभव केला. तेव्हां सय्यद फारच संतापून त्यानें स्वतः निजाम उल्मुल्कावर जाण्याची तयारी केली. या तयारी बरोबर त्यानें मराठ्यांचीही मदत मागितली. शाहुमहाराजांनीं खंडेराव दाभाडे सेनापति यांस कांहीं स्वारांनिशीं जाऊन सय्यदास मदत करण्याची आज्ञा केली व त्याप्रमाणें खंडेराव दाभाडे निजामावर चालून गेले. पण खंडेराव दाभाड्यांची कुमक सय्यदास जाऊन मिळण्या पूर्वींच सय्यदाची व निझामाची लढाई होऊन त्यांत सय्यद पडला, निझामाचा जय झाला. ही बातमी खंडेराव दाभाडे यांस लागतांच ते परत फिरून साताऱ्यास आले. ही गोष्ट सन १७२० सालीं घडली.

खंडेराव दाभाडे साताऱ्यास परत आल्यावर याच सालीं सातारच्या दरबारांत विशेष लक्ष्यांत ठेवण्यासारखी एक गोष्ट घडून आली. ती गोष्ट अशी कीं, सातारच्या दरबारांतील दोन तीन बडे बडे मुत्सद्दी या सालांत वारले. त्यांत बाळाजी विश्वनाथ पेशवा हाही वारला. बाळाजी विश्वनाथ हा जात्या शूर व धोरणी असल्यामुळें आपल्या जोडीचा आपला एक वीर गेला असें वाटून खंडेराव दाभाडे

सेनापति यांस फार वाईट वाटलें. शाहू महाराजांस बाळाजी विश्वनाथ यांच्या मृत्यूनें आपल्या विजयशाली जोडींतील एक हिरा हरवला ह्मणून फारच वाईट वाटलें.

आपला जोडीदार या जगांतून नाहींसा झाला, असें पाहून खंडेराव दाभाडे यांनीं संधी पाहून महाराजांपाशीं आपला वडील पुत्र त्र्यंबकराव दाभाडे यांस सेनापतीचीं व सेनाखासखेलीचीं वस्त्रें देऊन आपणास आतां मोकळें सोडावें अशी गोष्ट काढली. ते शाहू महाराजांस म्हणाले कीं, माझा आतां वृद्धापकाळ झाला आहे सबब वडील पुत्र त्र्यंबकराव दाभाडे यांस आपल्या सेवेंत घेऊन त्यास गुजाराथेची मोहीम सांगावी.

शाहु महाराजांनीं खंडेराव दाभाडे सेनापति यांचें बोलणें मान्य करून त्र्यंबकराव दाभाडे यांस सेनापतीचीं वस्त्रें देऊन त्यांस गुजराथेची मोहीम सांगितली.

महाराजांची आज्ञा होतांच त्र्यंबकराव दाभाडे सेनापति यांनीं आपल्या बरोबर पिलाजी गायकवाड यास घेऊन ते गुजराथेच्या मोहिमेवर चालते झाले.

त्र्यंबकराव दाभाडे गुजराथेंत गेल्यानंतर सन १७२१ सालीं खंडेराव दाभाडे सेनापति सेनाखासखेल हे साताऱ्यास असतां त्यांस मुतखड्याचा विकार झाला ह्मणून ते साताऱ्याहून निघून तळेगांवास आले. आपले वडील मुतखड्याच्या आजारानें

हेगण होऊन तळेगांवास गेले ही बातमी त्रिंबकरावांस कळतांच त्यांनीं गुजराथेंत मिळविलेल्या मुलखाचा बंदोबस्त राखण्याकरितां पिलाजी गायकवाड, देवजी तापकीर, हवजी रक्षे व बरगे वगैरे सरदारांस ठेवून आपण ताबडतोफ तळेगांवीं वडिलांपाशीं येऊन दाखल झाले.

आतांपर्यंत बाळाजी विश्वनाथ यांस वारून सुमारें ७ महिने झाले होते. या साता महिन्यांत पेशवाईची जागा मुळींच भरलेली नव्हती. पण या वेळीं बाळाजीचे वडील चिरंजीव बाजीराव बल्लाळ यांचा तल्लख व धाडशी स्वभाव आणि राज्य काबीज करण्याची विशेष हाव अवलोकन करून शाहु राजे यांनीं त्यांस त्यांच्या वडिलांचीं पेशवाईचीं वस्त्रें दिलीं.

याच संधीस आपल्या कथानकाचा नायक, जो एक वेळ मुसलमानांचा कर्दनकाळ बनून राहिला होता, ज्यानें स्वामीसेवेंत जीवाची पर्वा न धरतां हाडाची काडें करून घेतलीं होतीं, ज्यानें आजन्मांत अनृत भाषणानें आपली जिव्हा विटाळलीच नाहीं, जो सत्यप्रतिज्ञ इतका कीं, कलियुगांतील एक भीष्माचार्यच आणि जो मराठ्यांच्या राज्याचा मुख्य आधारस्तंभ तो खंडेराव दाभाडे सेनापति सेनाखासखेल यास त्याच घातुक मुतखड्याच्या अजारामुळें तळेगांव मुक्कामीं देवाज्ञा झाली ! !

खंडेराव वारल्याची बातमी चोहींकडे पसरतांच त्याच्या शत्रूचे बाहु स्फुरण पावून मराठ्यांच्या तर कंबराच खचल्या. शाहु महाराजांस वडील महाराज वारल्याचेंही इतकें दुःख वाटलें नाहीं तितकें परमावधीचें दुःख खंडेराव दाभाड्यांच्या मृत्युनें वाटलें आणि सर्व महाराष्ट्रांत एकदम सून्न होऊन गेलें !

याप्रमाणें खंडेराव दाभाडे यांचा अंत झाला. त्यांच्या मागें त्यांचे तिघे पुत्र मात्र राहिले. त्यांत वडील त्रिंबकराव, मधले यशवंतराव आणि कनिष्ट बाबुराव असे होते. हे तिघेही पुत्र खंडेरावांच्या प्रतिमेचेच होते असें त्यांच्या पुढील हकीगतीवरून सर्वांच्या सहज लक्ष्यांत येणार आहे. असो.

एका खंडेरावाच्या हयातींत मराठी राज्यांत केवढाले फेरफार झाले ! थोरल्या शिवछत्रपतीचे वेळीं आमचे खंडेराव आपल्या एकनिष्ट वडिलांबरोबर महाराजांची सेवा करीत होतेच. पुढें संभाजी व राजाराम महाराज यांच्या निरनिराळ्या स्वरुपाच्या कारकीर्दींत खंडेराव निरनिराळ्या पेशानें होतेच. पुढें ताराबाईची सगळी व शाहुमहाराजांची अर्धी कारकीर्देही त्यांनीं पाहिलीच व नुसती पाहिली एवढेंच नसून ह्या कारकीर्दी त्यांनीं आपल्या हातानें बनविल्या असें ह्मणण्यासही प्रत्यवाय दिसत नाहीं.

एवढ्या या मराठेशाईतील कारकीर्दींत देशांत किती दंगे झाले असतील, किती उलाढाल्या झाल्या असतील किती माणसें जाया झालीं असतील याचा

हिशेब पाहूं गेल्यास खचित थांगच लागणें कठीण! तशांतही मराठ्यांच्या गादीवर जे जे राजे झाले किंवा ज्या ज्या कारकीर्दी झाल्या ते ते राजे किंवा त्या त्या कारकीर्दी एकाच स्वभावाच्या किंवा एकाच झोंकाच्या होत्या असाही अर्थ नाहीं. तर अशा निरनिराळ्या राजांची नोकरी करणें व नुसती नोकरी करणेंच नव्हे, तर प्रत्येकाची मर्जी संपादून देश किंवा देशांतील लोक ऊर्जित दशेस आणणें आणि त्याचप्रमाणें निरनिराळ्या स्वरुपाच्या कारकिर्दींत राहून प्रतिष्ठा राखणें हें काम किती अवघड आहे याचा विचार सांगण्यापेक्षां ज्याचा त्यानें करावा हेंच चांगलें, आणि अशा स्थितींत आमच्या खंडेरावानें राहून आजन्मपर्यंत जर अपेश घेतलें नाहीं तर खंडेराव किती थोर पुरुष होता याचाही अदमास सहज होतो. असो.

खंडेराव दाभाडे हे स्वतः पहिल्या प्रतीचे एकनिष्ठ सेवक होते. यांच्या आंगीं विनयादि गुण परिपूर्ण होते. शूरत्व तर त्यांच्या आंगीं खिळलेलें असे. हे फारच सत्यप्रीय असत. पराक्रमाबद्दल तर त्यांच्या वेळीं त्यांचें साम्य पावणारा दुसरा एकही सुवीर नव्हता म्हटलें तरी चालेल. यांच्या आंगीं धाडस विशेष होतें. स्वधर्मावर श्रद्धा फार होती. स्वदेशाभिमानाचें वारें यांच्या आंगीं सणसणून होतें. स्वामीचें कार्य साधणें हाच मुख्य धर्म हे मानीत. यांचा स्वभाव थोडा मानीही असे.

यांचा रंग निमगोरा होता. शरीराची काठी बळकट व उंच असून बांधा आंगाबरोबर असे. अस्तु.

अशा गुणांचे लोक ज्या देशांत ज्या वेळीं उत्पन्न होतील त्या वेळीं त्या देशांत पर पीडेचें नखही दृष्टी पडावयाचें नाहीं हें निर्विवाद आहे. पण कालचक्राचा फेरा कोणाच्याच हातीं नसल्यामुळें असले लोक अमुक वेळीं होतीलच किंवा अमुकवेळीं व्हावयाचेच नाहींत हें कोणाच्यानेंही ठरवणार नाहीं. मराठ्यांच्या उदयकाळाच्या वेळीं खंडरावासारख्या सर्व गुणसंपन्न गृहस्थास कोणी पाचारण कां केलें होतें? परंतु मराठ्यांचा उदयकाळ होण्याची ती वेळ असल्यामुळें असले पुरुष आपोआपच निष्पन्न होत असत व हाच कालमहिमा ह्मणावयाचा!

गेले, ते मराठ्यांचे दिवस गेले, ते खंडेराव दाभाडे गेले, ते शिवाजी महाराज, शाहु महाराज गेले, ते बाळाजी विश्वनाथ गेले व मोरोपंत पिंगळेही गेले! त्यांच्याच बरोबर त्यांचें ऐश्वर्यही गेलें आणि आज मितीस आपल्या वांटणीस एकमेकांस चावूं कां डसूं ह्मणणारे ब्राह्मण मराठे उरले आहेत! तर अशा लोकांच्या कारकीर्दींत ऐश्वर्याच्या ऐवजीं देशांत चोहींकडे हापाप कां दिसणार नाहीं?

असो. आपल्यास सोडून आज जरी आपले खंडेराव दाभाडे सेनापति गेले, तरी अद्याप आपल्यास शूर व प्रति खंडेरावच अशा त्यांच्या बछड्यांची भेट घ्यावयाची आहे. करितां वाच-

कांनीं त्या त्यांच्या बाणेदार व रणधीर पुत्रांची भेट घेण्यास तयार व्हावें.

# भाग पांचवा.

## खंडेराव दाभाडे यांचे पुत्र त्रिंबकराव, दाभाडे सेनापति.

खंडेराव दाभाडे परलोकवासी झाले, हें वृत्त मागील भागांत कथन केलेंच आहे. त्यांस तिघे पुत्र होते. पहिले त्र्यंबकराव, दुसरे यशवंतराव व तिसरे बाबूराव. खंडेराव दाभाडे यांची हुषारी व इभ्रत पाहून आपलें सेनापतीचें व सेनाखासखेलीचें पद श्रीमंत शाहु महाराजांकडून त्यांस देवविलें होतें हें पूर्वीं सांगितलेंच आहे. त्यांजला तें पद मिळून ते गुजराथेंत मोहिमेवर गेले होते; पण इकडे वडिलांची प्रकृत विघडल्याचें ऐकून तळेगांवास आले होते. अर्थात वडिलांच्या अंतकाळीं ते त्यांच्याजवळच होते. वडिलांचें देहावसान झाल्यावर त्यांनीं त्यांची उत्तरक्रिया वगैरे यथासांग करून ते महाराजांच्या दर्शनाकरितां सातार्‍यास गेले. त्यांचे बरोबर त्यांचे उभयतां एकनिष्ट बंधुही महाराजांच्या दर्शनार्थ गेले होते.

श्रीमंत शाहू महाराजांनीं तिघांही बंधूंचा मोठा मान राखून त्यांस वस्त्रालंकार दिले. आणि आतां

तुह्मी पुनः गुजराथेंतील मोहिमेवर जावें ह्मणून आज्ञा केली. त्याप्रमाणें तिघेही बंधु गुजराथेच्या मोहिमेवर चालते झाले.

इकडे बाळाजी विश्वनाथ यांच्या मागें त्यांचा पुत्र बाजीराव बल्लाळ पेशवाईचें पद पावला होता, त्यास महाराजांनीं माळव्याची मोहीम सांगितली. व त्याप्रमाणें बाजीरावही माळव्यांत निघून गेला.

सेनापति दाभाडे व बाजीराव पेशवे दोघेही राजाज्ञेप्रमाणें मुलुखगिरीस निघून दोघांनींही अनुक्रमें गुजराथेंत व माळव्यांत मुलुख काबीज केले. येथपर्यंत सर्व मोहिमेचें काम सुरळीतपणें चाललें होतें.

थोडेच दिवसांनीं बाजीराव यानें दाभाड्याशीं बोलणें लाविलें कीं, गुजराथेंतील तुह्मी मिळविलेले कांहीं परगणे आम्हास द्यावे व माळव्यांतील आह्मी मिळविलेले परगणे तुम्हास देतों. असा मोबदला करण्यांत बाजीराव पेशव्याचा काय हेतु होता हें बरोबर समजत नाहीं, पण त्रिंबकराव दाभाडे सेनापति यांनीं बाजीरावाचें मागणें मुळींच नाकारून त्यास उलट कळविलें कीं, तुम्हास माळव्यांत व आम्हास गुजराथेंत मोहीम सांगितली. त्याप्रमाणें उभयतांनींही मुलुख काबीज करून राज्य वाढविलें. तर आतां तुह्मी आपल्या मुकत्यारीनेंच जो हा मोबदला करण्याचे ठरवीत आहां तो आह्मास बिलकुल पसंत नाहीं. यापेक्षां तुह्मी व आह्मी उभय-

तांनींही हा मजकुर महाराजांच्या कानावर घालून त्यांची पुढें जशी आज्ञा होईल तसें करूं.

दाभाडयाच्या या ह्मणण्यास बाजीरावाचाही रुकार पडून ते उभयतांही साताऱ्यास निघून आले; आणि उभयतांनींही आपलें ह्मणणें शाहुमहाराजांस कळवून त्यांची आज्ञा विचारली.

महाराजांनीं उभयतांचेंही बोलणें ऐकून घेतल्यावर पूर्ण विचार करून आज्ञा केली कीं, ज्या अर्थीं तुह्मास माळव्याची मोहीम सांगितली आहे व सेनापतीस गुजराथची मोहीम सांगितली आहे, त्या अर्थीं तुह्मी काबीज केलेल्या मुलखावर तुह्मी अम्मल करावा व सेनापतींनीं काबीज केलेल्या मुलखावर सेनापतींनीं अम्मल करावा. मोबदला करण्याची मुळींच जरूर नाहीं. व आपसांत कलहाचें बीजारोपण करणें ही इष्ट नाहीं.

शाहुराजे छत्रपति यांची ही आज्ञा होतांच बाजीराव निरुत्तर झाला. तथापि ती गोष्ट मात्र त्याच्या मनांत राहिली, असें त्याच्या पुढील कृतीवरून दिसतें. असो. उभयतांसही महाराजांची आज्ञा झाल्या बरोबर दोघेही माळव्यांत व गुजराथेंत आपापल्या कामगिरीवर चालते झाले.

बाजीराव पेशव्यानें प्रांत मोबदला करण्याचा जो डाव टाकला होता तो त्याच्या स्वतःच्या बुद्धीचा नसून त्याचें मन एका परकी, पण महा कपटी, धूर्त व आत्महितविषयीं दक्ष अशा मनुष्यानें क-

दूषित केलें होतें. तथापि शाहुमहाराजांची आज्ञा झाल्यावरून अर्थात बाजीरावानें टाकलेला तो डाव त्याच्या मुळींच पथ्यावर पडला नाहीं. पण बाजीराव पेशव्यानेंही त्या गोष्टीचा पुढें फारसा विचार केला नाहीं.

असा हा वस्ताद पक्की मनुष्य कोण असावा ही शंका वाचकांस सहजीच उद्भवणार आहे, पण हा गृहस्थ प्रसंगवशांत आपल्या कथानकांत आपल्यास एक वेळ आढळला असल्यामुळें तो सर्वांच्या ओळखीचा आहे. मागील भागांत जो निजामउल्मुल्क नांवाचा मुसलमान मुत्सद्दी आपल्या वाचण्यांत आला आहे तोच हा वस्ताद गृहस्थ होय.

या खट्पीनें दोघां सयद बंधूंचा धुवा उडवून देऊन दिल्लीदरबारांत आपलें वजन इतकें बसाविलें कीं, याच्या सम्मत्तीवांचून त्या दरबारांत पानहीं हालेनासें झालें. तथापि हा निजामउलमुल्क इतका कावेबाज होता कीं, त्यानें दिल्लीच्या राज्याची फारशी पर्वा न बाळगतां आपण खाजगत मिळविलेला जो प्रांत होता तो कायम राहून वाढला कसा जाईल या विचारांत तो नेहमीं असे. शिवाय मराठ्यांचें राज्य रसातळास जाऊन पुनः एकवार चोहींकडे महमदी व्हावी अशीही त्यास मोठी महत्वकांक्षा होती. आणि हे आपले सर्व हेतु तडीस कसे जातील या मसलतींत तो नेहमीं गुंग असे.

हा आपल्या मनांतील हेतु साधण्या करितां त्यानें मराठे लोकांत फूट पाडण्याचा निश्चय केला. आणि त्या निश्चयानुसार त्यानें बाजीरावाच्या मनांत दाभाडयांनीं मिळविलेले गुजराथेंतील प्रांत मोबदला मागण्याचें भरविलें. पण शाहुमहाराजांनीं मध्येंच खो घातल्यामुळें ती गोष्ट मुळींच घडून आली नाहीं. आपल्या मनाप्रमाणें गुजराथेंतील प्रांत आपल्यास मोबदला मिळाले नाहींत या गोष्टीचें बाजीराव पेशव्यास जितकें वाईट वाटलें त्यापेक्षां कावेबाज निजामउल्मुल्कास फारच वाईट वाटलें; आणि ही गोष्ट ऐकल्यापासून त्यास रात्रंदिवस तळमळ लागून बिलकूल चैन पडेना.

अशा स्थितींत त्याच्या सुदैवानें त्यास एक उत्तम युक्ति सुचली व त्या युक्तीच्या योगानें त्याचा इच्छित मनोरथ परिपूर्ण झाला एवढेंच नव्हे तर ती त्याची युक्ति मराठयांच्या राज्यरूपी वृक्षास एक जबरदस्त कीडच लागली असेंही ह्मणावें लागतें; आणि आजमित्तीस ब्राह्मण व मराठे यांच्यांत फूट पाडण्याचा ज्यानीं प्रयत्न चालविला आहे व ज्यांच्या प्रयत्नास हल्लीं चांगली फळें येऊन जे लोक त्या फळांचा आस्वाद मोठया आनंदानें घेत आहेत त्यांस देखील या निजामउल्मुल्खाची युक्ति कित्याच्या ठिकाणीं उपयोगी पडली असून स्वतः निजामउल्मुल्क गुरूच्या ठिकाणीं उपयोगी पडले आहेत! तेव्हां शिखरास पोंचलेल्या कावेबाज का-

रकीर्दींत जो गुरुस्थानीं झाला तो निजामउल्मुल्क केवढा कावेबाज असेल याचा अदमास वाचकांनीं च करावा. अस्तु.

मराठयांच्या दरबारांत या वेळीं कर्तुमाकर्तुम शक्तीचे असे दोनच सरदार होते व या दोघांच्याच फक्त जीवावर सर्व मराठी राज्याचे झेंडे पृथ्वीभर फडकत होते. ते सरदार एक बाजीराव पेशवा व दुसरे त्रिंबकराव दाभाडे हे होत. शाहु राजानें हे आपले दोन बाण दोन दिशेस सोडून सर्व देशांतील दाढी कपाईचें काम मोठ्या झपाट्यानें चालविलें होतें आणि या कामांत जर निजामउल्मुल्कासारखीं विघ्नें आड आलीं नसतीं तर न जाणो या मराठयांच्या एकोप्यानें व दर्पानें या भरतभूमींत एकादी तरी दाढी औषधास सांपडती कीं नाहीं कोण जाणें ! पण हिंदु लोकांचें एवढें भाग्य कोठून उदयास येणार !

कपटपटु निजामउल्मुल्कानें आपण बाजीराव पेशव्यावर सोडलेलें अस्त्र वाया गेलें असें पाहून त्यानें आपल्या कपटजाल भात्यांतून एक व अति तेजस्वी बाण काढला आणि त्या बाणाच्या एका बाजूवर "ब्राह्मण मराटे शाई बुडवितात" या त्रयोदशाक्षरी मंत्रास्त्राचा प्रयोग करून दुसऱ्या बाजूवर "दाभाडे मुसलमानास मिळून मराठी राज्याचे तुकडे करूं पहातात" या द्विगुणित मंत्रास्त्राचा प्रयोग केला आणि उत्तम

प्रकारचें शरसंधान चघून त्यानें या उभयतां एकजुटी-च्या महावीरांत तो आपला बाण सोडून दिला !

अहाहा ! त्या बाणाचा केवढा तरी प्रभाव ! तो सुटून दोघां वीरांच्या मध्यें समांतरावर आल्या-बरोबर आमचे रणशूर त्र्यंबकराव दाभाडे मोठमो-ठ्यानें ओरडून ह्मणूं लागले कीं, या ब्राह्मणानें मराठेशाई बुडवून ब्राह्मणशाई स्थापन करण्याचा घाट घातला आहे, करितां सर्व राजनिष्ठांनीं एक ठि-काणीं जमून मला साह्य करावें, मी या कृतघ्नाचें पा-रपत्य करतों.

इकडे बाजीराव पेशवा ओरडून बोलूं लागला कीं, मी स्वामिसेवेंत नेहमीं तत्पर असतां दाभाडे सेनापति मुसलमानांस सामील होऊन हिंदु राज्य बुडवूं पहात आहेत. करितां हिंदुधर्माचा अभिमान बाळगणारांनीं या वेळीं मला साह्य करावें. दाभाडे सेनापति यांच्या फौजेपेक्षां चतुर्थांश फौज जरी आ-ज मजजवळ नाहीं तथापि स्वधर्माकरितां व स्वामि-कार्याकरितां जेवढी फौज माझ्याजवळ आहे तेवढीच घेऊन मी दाभाडे सेनापति यांच्याशीं लढाई मारणार, मग या लढाईंत माझा प्राण वेंचला तरी मी त्याची फिकीर करीत नाहीं.

अशा प्रकारें या उभयतां वीरांच्या गर्जना हो-ऊन ते एकमेकांवर धांवून गेले आणि त्यांचे गुजराथ व माळवा यांच्या दरम्यान पवित्रेही सुरू झाले.

निजामउल्मुल्क हा दिल्लीस असतांना बाजीराव

पेशव्यानें त्याचा कित्येक बाबतींत उपमर्द केला हो-ता. तो रोष निजामाच्या मनांत राहिला असल्यामुळें तो नेहमीं बाजीराव पेशव्याची खोड मोडावयास बघत होता. आणि त्रिंबकराव दाभाडे सेनापति हेच आपल्यास वश झाले तर आपल्या मनाप्रमाणें बाजीरावाची खोड जिरविली जाईल अशी त्याची खात्री होऊन चुकली होती आणि याच हेतूनें त्यानें या प्रसंगीं त्रिंबकराव दाभाडे सेनापति यांचें मन बाजीरावाबद्दल कलुषित करून उभयतांचाही तंटा लावून दिला. या तंट्यांत निजामानें अर्थात दा-भाड्यांची बाजू घेतली होती.

पहा देशामध्यें परकी लोकांचा सुळसुळाट झाला ह्मणजे ते लोक आपआपसांत कसे तंटे ला-वून देऊन आपला फायदा करून घेतात तो ! असो-

सन १७३१ सालीं बाजीराव माळव्यांतून आ-पली फौज घेऊन निघाला तो गुजराथेंत दभोई ह्म-णून गांव आहे तेथें येऊन दाखल झाला. ही बातमी त्रिंबकराव दाभाडे सेनापति यांस कळतांच ते आपल्या बंधूस डभोईपासून सुमारें २० कोसांवर ठेवून आपण डभोईस येऊन साठ हजार फौजेनिशीं दाखल झाले. बाजीराव पेशवा डभोईवर येऊन पोंचण्यापूर्वींच पिलाजी गायकवाडच्या लोकांनीं त्या-च्या बिनीवर हल्ला करून पुष्कळ लोक मारले होते, पण बाजीरावानें त्यास न जुमानतां डभोईपर्यंत त्यानें तशीच मजल मारली.

त्रिंबकराव दाभाडे यांची कांहीं फौज डभोईस होती. तेथें बाजीराव अगोदरच येऊन पोंचला असल्यामुळें त्यानें सेनापतीच्या फौजेंत फंदफितुर करून ठेविला होता. त्रिंबकराव दाभाडे डभोईस येऊन पोंचतात न पोंचतात तोंच त्यांच्या कारभाऱ्यांनीं त्यांस वर्दी दिली कीं, फौजेंत बराच फितूर झाला आहे, करितां यावेळीं लढाईस तोंड न देतां बाजीराव पेशव्याशीं तह करावा. पण आमच्या या बहादर शिपायास ती गोष्ट मुळीच रुचली नाहीं. त्यानें एकदम सर्व लोकांस सांगितलें कीं, वडिलांच्या मागें लढाई करण्याचा हा पहिलाच प्रसंग आहे व ज्या अर्थीं बाजीराव पेशव्यानें आपल्यावर चढाई केली आहे त्या अर्थीं त्याला लढाईही दिलीच पाहिजे. त्यांत काय होणें असेल तें होईल. जर आमच्या लोकांपैकीं कोणास आपल्या जिवाची भीति वाटत असेल तर त्यांनीं खुशाल आपल्या मुक्कामांत जाऊन पडावें. आमची त्यांस बिलकुल मनाई नाहीं.

हें सेनापतीचें विरश्रीयुक्त भाषण ऐकून कारभारी मंडळ निरुत्तर झालें. बाजीरावानें दाभाड्याच्या फौजेंत पूर्वींच फितुर करून ठेविला असल्यामुळें लढाई सुरुवात होण्याचे वेळींच दाभाड्यांच्या फौजेंतील घोडेस्वार आपल्या घोड्यांस पाणी पाजण्याच्या मिषानें समरांगणांतून चालते झाले. लढाईच्या ठिकाणापासून नदीचा प्रवाह एक कोसावर वहात

होता तिकडे फितूर झालेले लोक जे एकदां गेले ते परत ह्मणून आलेच नाहींत !

सकाळच्याच प्रहरीं उभयतां फौजेची लढाई सुरू झाली. त्रिंबकराव दाभाडे सेनापति हे हत्तीवर स्वार होऊन तिरांनीं शत्रूच्या लोकांचा फन्ना उडवीत होते त्यावेळेस त्यांचा तो अविर्भाव व विरश्री पाहून हा कोणी भारती युद्धांतील आतिरथी महारथी विरांपैकींच शत्रूच्या नरडीचा घोट घेण्यास एक वीर उत्पन्न झाला आहे कीं काय असा भास होऊं लागला!

त्रिंबकराव दाभाडे हे तिरंदाजीच्या कसबांत इतके निष्णात झाले होते कीं, लोखंडाचे सात सात तवे एका समोर एक ठेवून जर यांनीं शरसंधान केलें तर यांचा तीर त्या साती तव्यांस भोकें पाडून पार जाई ! यांच्या विद्येमुळें या लढाईंत त्यांनी आपल्या शत्रूचे शेंकडो लोक स्वहस्तानें परलोकीं पाठविले.

त्रिंबकराव दाभाडे ह्मणजे धैर्याचा एक पुतळाच होता म्हटलें तरी चालेल. त्यांनीं आपला हत्ती कदाचित शत्रूच्या माराने परत फिरेल या भास्तीनें त्याच्या पायांत अंदू अडकावून त्यास खडे केलें होतें ! आंगांत चिलखत व डोळ्यास शिरस्त्राण घातलें होतें. ही या दोघांची लढाई इतक्या हातघाईस येऊन ठेपली कीं, दोन्ही फौजा एकत्र होऊन आपले लोक कोणते व शत्रूचे लोक कोणते हें ही एकमेकांस मुळींच कळेना.

बाजीराव पेशवे व त्रिंबकराव सेनापति हे उभ-

यतांही एकाच यजमानाचे सरदार असल्यामुळें दोघां-च्याही फौजेंत एकमेकांचे नातेवाईक रगड होते. पण क्षत्रिय धर्म मुळींच विलक्षण असल्यामुळें प्रत्ये-कास आपल्या नातेवाईकांस आपला हात दाखवून यमसदनीं पाठविण्य ची पाळी येतच असे.

असें हें पेशवे व सेनापति यांचें घणघोर युद्ध चाललें असतां पेशव्यांच्या फौजेंत कोणी त्रिंबकराव ढमढेरे नांवाचे गृहस्थ सरदारीच्या पेशांत होते. त्यांची व त्रिंबकराव दाभाड्यांची आकस्मात साम-न्यास गांठ पडली. ढमढेरे हे दाभाड्याचे चुलत भाचे असल्यामुळें त्यांनीं सेनापतीस विनंति केली कीं, मामासाहेब, आपल्या शिपाईगिरीगीची शर्थ झाली. आतां आपण तह करावा हें बरें दिसतें.

त्रिंबकराव दाभाडे सेनापति यांनीं चोख उत्तर दिलें कीं, युद्ध प्रसंगांत नातें बितें मुळींच ओळ-खावयाचे नाहीं. तूं आपल्या आईबापांस एकुलता एक आहेस सबब माझ्या हातानें तुझा नाश व्हावा हें इष्ट नाहीं, एवढ्या करितां येथून त्वां निघून जावें !

त्या खप्पीनें उत्तर केलें कीं, मामासाहेब, आपण मला निघूनजाण्यास सांगतां, पण मी जर पराङ्मुख होऊन या वेळीं निघून गेलों तर ढमढेऱ्याच्या व दाभाड्याच्या उभयतांच्याही कुळांस बट्टा लागा-वयाचा नाहीं काय ? तर जीवाची पर्वा करून मी पळून जावें आणि “ कुलांगार ” ही पदवी नांवास

जोडून घ्यावी हें का रास्त ठरतें ! यापेक्षां आपण मजवर हत्यार करावें, मीही शक्तीप्रमाणें जबाब देऊन उभयकुळें एकदम भूषवीन !

भाच्याचा हा रोकडा जबाब ऐकून त्रिंबकराव दाभाडे सेनापति मनांत फारच संतोषले आणि असला कुलदीपक भाचा आपल्यास आहे याचें त्यांस भूषण वाटलें ! जे जातीचे खरे शिपाई आहेत ते शत्रूच्या आंगांतील युद्ध चातुर्य पाहूनही समाधान पावतात ही रीतच आहे. असो.

सेनापति दाभाड्यांनीं आपल्या भाच्याचा हा निश्चय पाहून त्यास ते ह्मणाले कीं, बाळा त्रिंबका, तूं बच्चा आहेस, करितां तुझ्यावर प्रथम हत्यार करावें हा माझा धर्म नाहीं. करितां तूंच प्रथम हत्यार कर, मग काय व्हावयाचें असेल तें होईल ! हें ऐकतांच त्रिंबकराव ढमढेऱ्यानें आपला भाला सेनापतीवर फेंकला. तो माहुताच्या डोक्यांतून फार जाऊन सेनापतीच्या आंबारीचाही त्यानें समाचार घेतला. हें ढमढेऱ्याचें कृत्य पाहून त्रिंबकराव दाभाडे यांस कौतुक वाटलें, परंतु क्षात्रधर्मास अनुसरून त्यांनीं ढमढेऱ्यास जो तीर मारला त्याच्या योगानें तो घोड्या सुद्धां चित होऊन पडला ! !

अशा प्रकारें हातघाईची लढाई होत असतां त्रिंबकराव दाभाडे सेनापति यांच्या फौजेनें जी एकदम उचल केली, त्याच्या योगानें बाजीरावाची फौज एक कोस माघारी हटली. दाभाड्यांच्या फौ-

जेचा खचित जय झाला असें वाटून जयघोषाचीं वा-द्येंही सेनापतीच्या फौजेंत वाजूं लागलीं. इतक्यांत एक विलक्षण चमत्कार घडून आला. बाजीरावाच्या बाजूस कांहीं फितुरी लोक गेलेले होतें. त्यांतच त्रिंबकराव दाभाडे यांचे सापत्न मातुल भाऊ सिंग-राव ठोके हे एक होते. त्रिंबकराव दाभाडे यांनीं गरमी बहुत झाली असें पाहून डोकीचें कवच क्षण-मात्र काढून हातांत घेतलें तोंच वरील ठोके यांनीं संधी साधून पेशव्यांकडील एका बारगिरास गोळीचा नेम धरण्यास सांगितलें. त्या बारगिरानें नेमकें निशाण धरल्यामुळें त्रिंबकराव दाभाडे यांच्या आं-खांतून गोळी पार निघून गेली व ते लागलीच मूर्छा-गत होऊन पडले !

याप्रमाणें खासा पडल्यावर मग काय विचाराव-याचें आहे ! फौजेंत जिकडे तिकडे पळ सुरू झाला. कोणाचा दाब कोणावर नाहींसा झाला. शत्रूस तर ही उत्तमचें संधी सांपडल्यामुळें त्यांचा एकसारखा हल्ला येऊन पडूं लागला. या धालमे-लींत दाभाडे सेनापति यांच्या बाजूचे जाउजी दा-भांडे, मालोजी पवार, पिलाजी गायकवाडाचे एक चिरंजीव वगैरे मंडळी ठार होऊन उदाजी पवार व चिमणाजी पंडित हे शत्रूच्या हातीं सांपडले. आनंद-राव पवार व पिलाजी गायकवाड हे जखमी झाले, परंतु शत्रूच्या हातीं लागले नाहींत.

हा घोर युद्धप्रसंग एवढ्यानेंच शेवटास गेला

असें नसून दाभाड्यांच्या पुरुषांनीं बाजीराव पेशव्याची पुढेंही पाठ पुरविलीच.

त्र्यंबकराव दाभाडे सेनापति यांनीं समरंगणीं येतांना आपले उभयतां कनिष्ट बंधूंस कांहीं अंतरावर ठेविलें होतें ह्मणून वर सांगितलेंच आहे. या उभयतां बंधूंस त्र्यंबकराव सेनापति पडल्याची खबर कळतांच ते तावडतोब निघून लढाई चालली होती त्या ठिकाणीं येऊन पोंहोचले. त्या वेळीं सुमारें प्रहररात्र झालेली होती. प्रथम त्यांनीं त्र्यंबकराव दामाडे सेनापति यांस हत्तीवरून खालीं उत्तरलें आणि त्यांचा दहनादि संस्कार केला.

यशवंतराव दाभाडे व बाबुराव दाभाडे हे फौजेंत येऊन दाखल झाले, अशी बातमी बाजीराव पेशव्यास कळतांच त्यानें रातोरात कुच करून पुण्याचा रस्ता धरला॰ तों यांच्या त्यांच्या दरम्यान वीस कोसांचा अंतर राहिला. यशवंतराव व बाबुराव यांस बाजीराव गेल्याची बातमी लागतांच त्यांनींही त्याचा पाठलाग केला, पण दोन फौजेंत जें अंतर होतें तें साताऱ्यापर्यंत सारखेंच राहिलें.

साताऱ्यास प्रथम बाजीराव पेशवे पोहोंचले. ते तेथें पोहोंचल्या बरोबर त्यांनीं प्रथम श्रीमंत महाराज यांची भेट घेतली. आपण दाभाड्यांशीं लढाई केली हें अनुचित कर्म केलें, हें बाजीरावाच्या मनांत डाचत होतेंच. शिवाय श्री. शाहुमहाराजास ही गोष्ट नापसंत पडून त्यांची आपल्यावर इतराजी

होईल कीं काय याची ही त्याला मोठी भीति वाटत होती. या कारणानें तो जेव्हां साताऱ्यास येऊन पोंहोंचला तेव्हां त्यानें भेटीबरोबर महाराजांचे पाय जाऊन घट्ट धरले.

श्री. शाहु महाराजास बाजीरावानें असलें वाईट कर्म केलें असेल असें मुळींच वाटलें नाहीं. बाजीरावास उठावयास सांगितलें असतांही जेव्हां बाजीराव पाय सोडीना, तेव्हां महाराजांस मोठा अचंबा वाटून त्यांनीं तुझ्यावर कोणतें संकट आलें आहे ह्मणून बाजीरावास विचारलें. बाजीरावानें तसेंच उत्तर केलें कीं, प्रथम मला जर सरकारचें अभयवचन मिळेल तर मी सर्व हकीगत सांगतों.

शाहु महाराजांचा स्वभाव जात्या मोठा भिडस्त व दयाळू असल्यामुळें त्यांनीं बाजीरावाच्या हातून एकादें घातुक कर्म घडलें असेल अशी वाईट कल्पना मुळींच न आणतां त्यांनीं त्यास एकदम अभय देऊन सोडलें. महाराजांचें अभय मिळाल्या बरोबर बाजीरावानें श्रीशाहु महाराजांचे पाय सोडून देऊन तो हात जोडून महाराजांपुढें नम्रपणानें उभा राहिला. आणि केविलपणानें महाराजांजवळ विनंति करूं लागला कीं, माझ्या हातून जें कृत्य होऊं नये तें झालें. त्या माझ्या कृत्यानें मी राज्यासही मोठा अपाय केला. तर ते माझे सर्व अपराध धन्यांनीं पोटांत घालून माझें संरक्षण करण्याचें जर मला आश्वासन दिलें तर माझी धडगत आहे

नाहीं तर मला जगांत तोंड दाखविण्यास जागा राहिली नाहीं.

हें त्याचें बोलणें ऐकून महाराजांनीं त्यांस पुनः आश्वासन दिलें. त्या वेळीं बाजीराव पेशव्यानें गुजराथेंत झालेली इत्थंभूत हकीगत महाराजांस निवेदन केली.

त्याची ती सर्व हकीगत ऐकल्या बरोबर श्री. शाहु महाराजांच्या आंगाचा तिळपापड होऊन गेला. बाजीरावानें आपल्या बरोबरीचा एक मोहोरा आपल्या हातानें दवडून स्वतःस निर्बळी करून घेतलें ते घेतलेंच. शिवाय त्रिंबकराव दाभाडा ह्मणजे सामान्य पुरुष नसून तो मराठी राज्याचा एक आधारस्तंभ असतांही बाजीरावानें त्याचा मुद्दाम नाश करून राज्याचीही मोठी हानी केली, असें महाराजांच्या मनांत येऊन बाजीरावाचें याच क्षणीं पारपत्य करावें असें सकृद्दर्शनीं त्यांच्या मनांत आलें. तसेंच दाभाड्यांच्या घराण्याची पूर्वींपासूनची एकनिष्ठ सेवा मूर्तिमंत त्यांच्या डोळ्यांपुढें उभी राहून त्रिंबकराव दाभाड्याकरितां त्यांच्या पोटांत भडभडून आलें आणि बाजीरावाचे याचक्षणीं शतशः तुकडे करून त्यास दृष्टीआड करावा इतका त्यांचे मनांत संताप उत्पन्न झाला!

परंतु शाहूराजा ह्मणजे स्वस्थपणाची एक मूर्तीच असल्यामुळें आणि एकदां गेलेला शब्द कसाही प्रसंग आला तरी परत घ्यावयाचा नाहींच, हा

त्याचा उपजत अंगस्वभाव असल्यामुळें त्यानें विचारानें तो आपला सर्व राग गिळून टाकला आणि आपण बाजीरावास पूर्वी अभय दिलें असून तशांतही हा ब्राम्हण असल्यामुळें याचें पारिपत्य करणें प्रशस्त नाहीं अशी त्याच्या मनाची समजूत झाल्यामुळें राजानें बाजीरावाची थोडीशी निर्भत्सना केली, तथापि अखेरीस त्यास यशवंतराव दाभाडे व बाबूराव दाभाडे यांच्या हातून तुला अपाय होऊं देत नाहीं, एवढेंच नव्हे तर त्यांचा तुमचा पुनः स्नेहसंबंध जमवून देतों असेंही कबूल केलें.

बाजीरावानें साताऱ्यास येऊन इतकें संधान बांधलें इतक्यांत यशवंतराव दाभाडे व बाबूराव दाभाडे साताऱ्यास येऊन दाखल झाले. ते साताऱ्यास पोंचल्याबरोबर राजदर्शनास गेले तों त्यांनीं नुसत्या दरबारच्या झोंकावरून बाजीराव पेशव्यास शाहूमहाराजांनीं पाठीशीं घातलें असें ताडलें. तो दरबारचा नोक झोंक पाहून उभयतां बंधूंसही वाईट वाटलें.

त्यांनीं महाराज छत्रपति यांस स्पष्ट सांगितलें कीं, ज्या अर्थी आमचा काडीइतकाही अपराध नसतां बाजीरावानें आमच्याशीं सर्व प्रकारें दगा करून त्याचें आपण शासन न करतां उलट त्याला पाठीशींच घातलें आहे, त्या अर्थी आमच्या हातून आतां एवढी स्वामिसेवा बस झाली. पुढें आम्हास चाकरी मुळींच कर्तव्य नाहीं. असें म्हणून त्यांनीं

आपल्या हातांतील तरवारी महाराजांपुढें ठेविल्या आणि महाराजांस मुजरा करून ते झटक्यासरसे चालते झाले.

यांचा राग यांस अनावर होऊन त्या झपाट्यांत चालते झाले, हें पाहून शाहुमहाराजांनीं त्यांस समजवून परत आणविण्या करितां मंत्री व प्रतिनिधी यांस पाठविलें, पण यशवंतराव व बाबुराव हे रागाच्या झपाट्यांत जे निघाले ते पुढें मागें न पहातां थेट तळेगांवास चालते झाले.

शाहूमहाराज हे मनाचे कोंवळे तर होतेच, शिवाय त्यांच्या आंगीं न्यायबुद्धि उत्तम प्रकारची असून त्यांस मनुष्याचें आगत्यही विशेष असे. शिवाय इतर मनुष्यांची त्यांनीं कधींच पर्वा केली नसती, पण ज्या घराण्यानें तीन पिढ्या सतत इमानानें गादीची चाकरी बजाविली त्या घराण्यांतील पुरुष आपल्यावर रुसून गेले असतां त्यांस कसें चैन पडणार ? तशांतही यशवंतराव व बाबुराव दाभाडे या तरुण बंधुद्वयांचा अथवा त्याचे वडील बंधु त्रिंबकराव दाभाडे यांचा कोणत्याही प्रकारें अपराध नसतां ज्या बाजीरावानें त्यांच्याशीं दग्याचें वर्तन केलें, त्या बाजीरावास आपण पाठीशीं घातलें हें मनांत येऊन श्री• छत्रपति शाहूमहाराज यांस दाभाडे गेल्यामुळें मुळींच चैन पडेनासें झालें. त्यांनीं लागलीच बाजीराव पेशव्यास बरोबर घेऊन त्यांच्या मागोमाग तळेगांवास प्रयाण केलें !

अहाहा ! शाहूमहाराजांची केवढी थोरवी व पदरच्या माणसाचें त्यांना केवढें अगत्य ! नाहीं तर पदरच्या माणसांची होईल तितकी फजिती उडवावयाची, त्यांस अन्नाची मोताद कशी पडेल याचा विचार करावयाचा, त्यानें जन्मभर इमानानें नोकरी बजविली तरी कांहीं कुभांड रचून त्या बिचाऱ्यांस ज्ञान मठांत ढकलावयाचें, जन्मभर नोकरी घेऊन अखेर आह्मांस तुमची जरूर नाहीं ह्मणून सांगून त्यांला पोटास पानें बांधावयास सांगावयाचें. ज्याच्या पूर्वजांनीं आपल्यावर महत उपकार केले असतील त्यांला कसा तरी नडवून पेचांत आणावयाचा अशा वाहिवाटी आपण कां थोड्या पहातों ? पण असल्या नीचांस शाहूराजाच्या पंक्तीस कधीं तरी बसवितां येईल काय ? आपले पाय भुईला लागण्यास व आपला सर्वस्वी फायदा होण्यास ज्या मांडलिक राजांचे पूर्वज कारणीभूत झाले असतील, किंवा ऐन बाणीच्या वेळीं ज्यानें आपल्यास साह्य केलें असेल त्याला निरपराधी उचलून बंदींत घालणें आणि त्याच्या राज्याचा किंवा हक्कांचा अभिलाष करणें अशा चक्रवर्ती राजांस चक्रवर्ती तरी ह्मणणें शोभेल काय ? अशा राजांस चक्रवर्ती म्हणण्यापेक्षां चाचे ह्मणणें विशेष शोभावयाचें नाहीं काय ? असो. आपले शाहूमहाराज केवढ्या थोर मनाचे ? त्यांच्या हातून आपल्या पदरच्या माणसांबद्दल हलगर्जीपणा कसा होणार. नाहीं तर शाहूमहाराजांसारख्या

छत्रपति राजांस दाभाड्यांसारखे नोकर मिळण्यास पंचाईत कां पडली असती? पण छे! दाभाड्यांची तरुण मुलें रुसून गेल्या बरोबर त्यांची समजूत घालण्यास महाराज स्वतः दाभाड्यांच्या गांवीं गेले!! अस्तु.

शाहूमहाराज तळेगांवास पोंचल्याबरोबर त्यांनीं प्रथम त्रिंबकराव दाभाडे सेनापति यांची उत्तरक्रिया करविली. आणि ती झाल्यावर लागलीच त्यांनीं बाजीराव पेशव्यास बरोबर घेऊन कैलासवासी खंडेराव दाभाडे यांचें कुटुंब. त्रिंबकराव, यशवंतराव, व बाबूराव दाभाडे यांची मातोश्री उमाबाई दाभाडे यांची भेट घेतली.

उमाबाई दाभाडे यांची भेट झाल्याबरोबर महाराजांनीं सकृद्दर्शनी बाजीराव पेशव्यास तिच्या पायांवर घातलें! आणि तिला मोठ्या कळकळीनें सांगितलें कीं, याच्या हातून जी गोष्ट घडूं नये ती घडली, पण आतां त्याचा याला पुरा पश्चात्ताप झाला आहे. खंडेराव दाभाडे आणि बाजीरावाचे तीर्थरूप बाळाजी विश्वनाथ या उभयतांचा स्नेह बंधूपेक्षांही विशेष होता. एकाचा रक्तबिंदु जेथें पडेल तेथें दुसऱ्याचें शिर पडावयाचें असें त्यांचें प्रेम असे! खंडेरावाचे हे तिघे, तसाच बाजीराव हा बाळाजी विश्वनाथाचा. सबब जसे हे तिघे तसाच हा चवथा तुझाच पुत्र आहे असें समजून याला तूं क्षमा कर आणि यापुढें तुझ्या पुत्रांनीं व बाजीरावानें

एकचित्तानें रहावें असें कर एवढें माझें तुला सांगणें आहे.

शाहू महाराजांसारख्या राजाचा शब्द खालीं कोण पाडणार ? आणि तशांतही उमाबाई दाभाडी सारख्या समंजस व पोक्त बायकोवर महाराजांनीं टाकलेला आणि तोही वात्रटपणाचा मुळींच नव्हे, मग काय विचारावयाचें ! त्या माउलीनें लागलीच महाराज आपल्या आज्ञेबाहेर मी व मुलें मुळींच नाहींत असा जबाब दिला.

महाराजांनीं बाईचा जबाब ऐकून त्यास मोठा आनंद झाला आणि दोन तीन दिवस पाहुणचार घेत महाराज तळेगांवास राहिले. तेवढ्या अवकाशांत दाभाडे यांनीं रिवाजाप्रमाणें सव्वा लाख मोहोरांचा चौत्रा करून महाराजांस मेजवानी केली आणि महाराज सातार्‍यास परत आले.

याप्रमाणें आपला रणशूर त्रिंबकराव दाभाडे यांचा शेवट झाला. त्रिंबकराव दाभाडे हे जात्या शूर व निग्रही असत. बाजीरावाशीं लढाई न करतां साम करावा असा यास केवढा आग्रह ! पण आपण होऊन तह करण्याचें याच्या स्वप्नांत देखील आलें नाहीं.

जे लोक जात्या शूर आहेत त्यांच्या मनांत कपटभाव कधींही यावयाचा नाहीं. कपटभाव त्यांच्या मनांत नसल्यामुळें जगांतील कोणताही मनुष्य कपटी नाहीं अशी त्यांची समजूत होते आणि तशी

समजूत झाली ह्मणजे दुसरा जें कांहीं सांगेल त्या-च्या भरंवसा बसतो. त्रिंबकराव दाभाडे सेनापति व बाजीराव पेशवा हे दोघेही नात्या शूर असल्या-मुळें त्यांनीं कपटपटु व आपमतलबी जो निजामउल्मु-ल्ख याच्या कळकळावणीवर भरंवसा ठेविला आणि त्यामुळेंच असा दुर्धर प्रसंग दाभाड्यांच्या घराण्या-वर येऊन त्याचा परिणाम अंशतः तरी महाराष्ट्री यांस भोगावा लागला. असो.

आज जरी आपले त्रिंबकराव दाभाडे सेनापति हे आपल्यास सोडून अक्षयसुख भोगण्याकरितां स्वर्गवासी झाले. तथापि आपल्यास अद्याप दा-भाड्यांच्या घराण्यांतील बऱ्याच पुरुषांची गांठ घ्या-वयाची असल्यामुळें त्रिंबकराव दाभाडे सेनापति यांचे दुःख जरा बाजूस ठेवून आपण त्यांच्या मागें राहिलेल्या त्यांच्या मातोश्री व त्यांचे उभयतां तरुण कनिष्ट बंधु यांजकडे वळूं.

---

# भाग सहावा.

## बाबूराव दाभाडे यांची सुरतेवरची स्वारी.

मागील भागांत शाहु महाराज तळेगांवाहून साताऱ्यास परत आल्याबद्दल सांगितलेंच आहे. महाराज साताऱ्यास आल्यावर त्यांनीं यशवंतराव दाभाडे व बाबुराव दाभाडे यांस आणि बाजीराव बल्लाळ यांस आपलेजवळ बोलावून त्यांस यापुढें एकमेकांशीं बिलकुल न भांडतां एकविचारें चालूं व एकमेकांबद्दल मनांत बिलकुल वैषम्य ठेवणार नाहीं, असें कबूल करून आपल्या पायांवर हात ठेवण्यास सांगितलें.

शाहू महाराजांची आज्ञा होतांच दाभाडे सेनापति व बाजीराव यांनीं महाराजांच्या पायांवर हात ठेविला व एकमेकांच्या हातांत हात घालून त्यांचें सख्य करून दिलें.

इतका प्रकार झाल्यावर महाराजांनीं यशवंतराव दाभाडे यांस सेनापतीचीं वस्त्रें दिलीं आणि बाबुराव यांस सेनाखासखेलीचीं वस्त्रें देऊं लागले त्या वेळीं, बाबुराव यांनीं साफ जबाब दिला कीं, मी धाकटा भाऊ असल्यामुळें मला वस्त्रें घेण्याचा अधिकार पोंचत नाहीं. पूर्वीं वडिलांच्या वेळेस हे दोन्हीही अधिकार त्यांसच होते त्याप्रमाणें आतांही दोन्ही अधिकाराचीं वस्त्रें वडील बंधु यशवंतराव

दाभाडे यांसच द्यावीं. माझ्या हातून सरकारची चाकरी अद्याप मुळीच झाली नाहीं. करितां मी सरकार सेवा बजावीपर्यंत मला कसलींच वस्त्रें नकोत. मी गादीची चाकरी बजाविली म्हणजे धनी जें पद मला देतील तें मी आनंदानें स्वीकारीन.

हा जबाब ऐकल्याबरोबर शाहू महाराजांस मोठें कौतुक वाटलें. वय लहान असून मनांत इतकी बंधुप्रीति असणें आणि आपल्यास मिळालेला मान वडील बंधूस देण्याचा आग्रह धरणें, या गोष्टी या कलियुगांत तर पौराणिक गोष्टींसारख्याच भासाव-याच्या ! तशांतही स्वपराक्रमानें दुसरें पद मिळवि-ण्याची या सिंहबालकाची उमेद पाहून शाहू सारखा राजा कौतुक कां नाहीं करणार ? महाराजांनी बाबुराव दाभाड्याची पाठ थोपटून सांगितलें कीं, तूं नुसताच बाबुराव नसून सवाई बाबुराव आहेस आणि तुझी राजनिष्ठा आणि पराक्रमाबद्दलची पूर्ण उमेद पाहून तूं गादीची सेवा यथायोग्य केलीस असेंच मी समजतों आणि त्या सेवेप्रीत्यर्थ तुला सेनाखासखे-लीचीं वस्त्रें आतांच देतों. तुझ्या हातून पुढें गादीची चाकरी जेव्हां घडेल तेव्हां आणखी एखादें नवें पद मी मोठ्या आनंदानें तुला देईन. असें ह्मणून म-हाराजांनीं सवाई बाबुराव दाभाडे यांस सेनाखास-खेलीचीं वस्त्रें देऊन शिवाय हत्ती, घोडा, शिरपेंच, कंठी वगैरे देऊन त्याचा मोठा मान केला.

या गोष्टीस महिना पंधरा दिवस लोटतात

लोटतात तोंच एक मराठ्यांनीं मोहीम करावी असा प्रसंग घडून आला.

पूर्वी शाहू महाराजांनीं शाली व मोती खरेदी करण्याकरितां आपले खाजगत कांहीं हुजरे सुरतेस पाठविले होते. त्यांच्याबरोबर जकात माफीचे वगैरे दस्तकही करून दिले होते. हुजऱ्यांनीं सुरतेस जाऊन माल खरेदी केला आणि इकडे घेऊन येऊं लागले तों नबाबाच्या लोकांनीं त्यांच्याजवळ जकात मागितली. त्यावरून महाराजांच्या हुजऱ्यांनीं जकात माफीचे परवाने त्यांच्यापुढें टाकले. त्या परवान्याची नबाबापर्यंत चौकशी होऊन आह्मी तुमच्या राजाचे परवाने मानीत नाहीं; तुह्मी ते हस्त नेऊन आपल्या राजास द्यावे; आह्मी तुह्मा-पासून जकात घेतल्याशिवाय रहाणार नाहीं वगैरे उद्दामपणाचा जबाब नबाबानें देऊन महाराजांच्या हुकमाचा अपमान केला.

त्या वेळचे ते हुजरेही पूर्ण अभिमानी असल्यामुळें त्यांच्या मनास ती गोष्ट लागून गेली. त्यांनीं शालजोड्या, बनाती व मोती वगैरे खरेदी केलेला माल तेथच्या तेथेंच टाकून आपण खुशाल साताऱ्यास निघून आले आणि नबाबाचा दांडगा जबाब महाराजांस निवेदन करून माफीचे दस्तक त्यांच्यापुढें टाकले.

सुरतच्या नबाबाचा तो दांडगा निरोप ऐकून शाहु महाराजांस अतिशय क्रोध आला. त्यांनीं तात्काळीच दरबार भरवून या गोष्टीचा विचार

केला. आणि सुरतच्या नबाबाची खोड कोणाकडून मोडवावी हा विचार सुरू झाला.

या दरबारास यशवंतराव व व बाबुराव दाभाडेही हजर होते. दरबारांत नबाबावर कोणास पाठवावे हा विचार निघाल्याबरोबर तरुण बाबुराव दाभाडे पुढें होऊन महाराजांच्या पुढें हात जोडून उभे राहिले आणि आज्ञा होईल तर हा सेवक नबाबाची खोड मोडून धन्यांची चाकरी बजावण्यास तयार आहे ह्मणून त्यांनीं विनंति केली.

बाबुराव दाभाडे यांचें वय अगदींच तरुण असून सुरतच्या नबाबाची खोड मोडण्याची त्यांनीं कंबर बांधलेली पाहून महाराजांस मोठें कौतुक वाटून त्यांस एकदम खंडेराव दाभाडे सेनापति यांचें स्मरण झालें. आणि हा वयानें जरीं लहान असला, तथापि सिंहाचा बछडा असल्यामुळें नबाबासारख्या मत्त गजाचें गंडस्थळ फोडण्यास कधींही चुकावयाचा नाहीं, असें महाराजांच्या मनांत येऊन त्यांनीं बाबुराव यासच या मोहिमेस पाठविण्याचा मनांत संकल्प केला. महाराजांनीं मनांत संतोषित होऊन जरी बाबुराव दाभाडे यांस पाठविण्याचा संकल्प केला, तरी हे अगदींच पोरपणांत असल्यामुळें महाराजांनीं त्यांस सांगितलें कीं, बाबुराव, तुमची सर्व फौज या वेळीं फितुर व बेदिल झालेली आहे. तिचा तुह्मी बिलकूल भरंवसा धरून उपयोगी नाहीं. करितां तुह्मी

बरोबर दुसरा एखादा सरदार सैन्यासह घेउन सुरतेवर जावें; आणि फत्ते करावी.

तेजस्वी वस्तूंत नेहमीं दोन प्रकार असतात. त्यांत कांहीं प्रकारच्या वस्तु स्वयंप्रकाश असतात व कांहीं परप्रकाश असतात. कांचादि अनेक वस्तु तेजस्वी असतात हें खरें, तथापि त्या परप्रकाश समजावयाच्या, त्याच्यावर दुसऱ्याचें तेज पडल्याशिवाय त्या कधीं चकाकावयाच्या नाहींत, पण चंद्रसूर्य इत्यादि वस्तु स्वयंप्रकाश होत. त्यांस दुसऱ्याच्या तेजाची कधींच जरूर लागत नाहीं. आमचे बाबूराव दाभाडे तरी चंद्रसूर्याच्याच जातीचे होते. त्यांस महाराजांचें बोलणें रूचणार कोठून ? त्यांनीं महाराजांस साफ उत्तर दिलें कीं, सरकारांनीं पाहिजे तर मागून फौज पाठवावी, मला फौजेची मुळींच जरूर नाहीं. मी हा आतांच निघालों. इतकें ह्मणून महाराज काय म्हणतात, त्याची वाट न पाहतां महाराजांच्या पायांवर डोकीं ठेवून आमचे सवाई बाबूराव सातारा सोडून एकदम सुरतेकडे चालते झाले !

या वेळीं बाबूराव दाभाडे यांचें वय जरी १९–१६ वर्षांचेच होतें, तथापि त्यास स्वतःची वस्तुस्थिति समजत नव्हती असें नाहीं. आपली फौज फितुर झालेली असून बेदिल आहे, हें ते पक्केपणीं जाणत होते. आणि एवढ्या करितांच त्यांनीं सुरतेच्या मोहिमेंत आपली फौज मुळींच

बरोबर न घेतां फक्त आपल्या खास पागेपैकीं निव-डक २१० स्वार बरोबर घेतले; आणि लागलीच कुच केलें.

साताऱ्याहून निघून दरकुच दरमजल ते खान-देशांतून सुरतेजवळ येऊन धडकले. सुरतेपासून कोस दीड कोसपर्यंत आल्यावर त्यांनीं एक सुरेख मसलत योजली. प्रथम सवाई बाबूराव दाभाडे यांनीं आपल्या स्वारांस नबाबासारखीं निशाणें दिलीं. आणि सर्व स्वार वेशी जवळ आणून उभे केले.

दाभाड्यांनीं सुरतेवर स्वारी केली. ते दिवस कार्तीक स्नानाचे होते. सबब तापी नदीवर लो-कांस स्नानास जावयाचें ह्मणून नेहमींपेक्षां शहरचे दरवाजे किंचित् लवकरच खोलले गेले. सवाई बाबूरावांनीं अशा वेळीं नबाब कोठें असावयाचा ही देखील बातमी आणून ठेविली होती.

सवाई बाबूराव दाभाडे सुरतेच्या वेशीपाशीं गेल्यावर त्यांस चौकीवाल्यांनीं हरकत केली, परंतु यांनीं आह्मांस नबाब साहेबांनीं कांहीं निकडीच्या कामाकरितां बोलाविलें आहे ह्मणून सांगितलें. चौकी वाल्यांनीं मराठ्यांच्या स्वारांचे पेहेराव न-बाबी स्वारासारखेच आहेत असें पाहून त्यांस शहरां-त सोडले. शहरांत सोडल्या बरोबर सेनाखास-खेल आपल्या लोकांसह किल्ल्याच्या दरवाजाशीं येऊन भिडले. त्या वेळीं किल्ल्याच्या दरवाज्या-

वरील पहारेकऱ्यांनीं यांस अर्थात् अटकाव केला. त्या बरोबर त्यांच्याशीं दाभाड्यांच्या लोकांनीं हात करून त्यांस जेथल्या तेथेंच चीत केलें. आणि खुशाल किल्ल्यांत प्रवेश केला. किल्ल्यांत गेल्या बरोबर बाबूरावांनीं नबाबाचें निशाण खालीं काढून प्रथम छत्रपतीचें निशाण चढविलें.

ज्या हुजऱ्यांचे दस्तक पूर्वीं नबाबानें नाकारले होते, ते हुजरे यांच्याबरोबर आलेलेच होते. व पूर्वीं खरेदी करितां ते वारंवार सुरतेस आले गेले असल्यामुळें त्यांस किल्ल्याची चांगली माहिती होती. त्यांच्या माहितीनें सवाई बाबूराव दाभाडे सेनाखासखेल यांनीं नबाबाची मशीद गांठली व मशीदी भोंवतीं आपल्या स्वारांचा घेरा घातला.

ती वेळ नबाबाची निमाज पढण्याची असल्यामुळें नबाब मशीदींत एकटाच निमाज पढत होता. सवाई बाबूरावांनीं मागेंपुढें न पहातां एकदम दहा पांच माणसांसह नबाबाच्या जवळ गेले, आणि आपापल्या समशेरी नंग्या करून नबाबा भोंवतीं खडे झाले.

एकाएकीं हा काय प्रकार झाला हें नबाबास मुळींच न समजल्यामुळें तो भयानें चकित झाला. आणि त्यानें मोठ्या नम्रपणानें दाभाडे यांस विचारलें कीं, तुम्ही कोण व कां आलांत ?

तें ऐकून बाबूराव दाभाड्यांनीं साफ उत्तर दिलें कीं, ज्याचे दस्तक तुम्ही झुगारून दिलेत त्यांचे

आह्मी घरचे नौकर आहों. तुह्मास सातार्‍यास कैद करून घेऊन यावें अशी आम्हांस आज्ञा आहे व त्याप्रमाणें आह्मास आज करणें आहे.

नबाब अगोदरच घाबरून गेला असल्यामुळें त्याच्या तोंडांतून प्रथम कांहींच जबाब निघेना. अखेरीस त्यानें सांगितलें कीं, मला तुह्मी मारूं नका. तुह्मी ज्या हेतूनें आला आहांत त्या हेतूच्या आड मी बिलकूल येणार नाहीं व तुह्मी जसें सांगाल त्याबरहुकूम वागण्यास माझ्या कडून किमपिही आळस व्हावयाचा नाहीं.

इतका प्रकार होत आहे तों ही बातमी सर्व किल्ल्यामर पसरली. व नबाबाच्या दोघा मुलांनीं पांच सातशें लोकांची जमात जमवून यांच्या मुकबल्यास येऊन ते दाखल झाले. सवाई बाबूरावांनीं नबाबाच्या मुलांची ही तयारी पाहून नबाबाच्या छातीवर एकदम आपली तलवार ठेवली; आणि त्यांस सांगितलें कीं, आपल्या मुलांस प्रथम आवरून धर. नाहींपक्षां आह्मी प्रथमदर्शनीं तुह्मी गर्दन उडवून नंतर काय होईल ते पाहूं.

नबाबास या वेळीं दुसरा इलाजच नसल्यामुळें त्यानें आपल्या मुलांचें निवारण केलें व तुह्मी गडबड कराल तर माझ्या जिवाची आशा तुम्हास सोडावी लागेल असें त्यानें आपल्या दोघां पुत्रांस सांगितलें तें ऐकून मुलांसही स्वस्थ रहाणें भाग पडलें.

आतां या लिगाडांतून कसें तरी पार पडलें पा-

ाहिजे हें मनांत आणून नबाबानें आपला एक हलकारा आपल्या पदरच्या चार मुत्सद्यांकडे पाठविला व त्यांस बिन हत्यारी मशीदींत येण्यास सांगितलें. त्याप्रमाणें नबाबाचे सरदार येऊन पोंचल्यावर नबाबानें दाभाडे यांच्याशीं बोलणें लाविलें. व त्यांस विचारलें कीं, तुमचें जें कांहीं ह्मणणें असेल तें तुह्मी येथें स्पष्ट सांगावें ह्मणजे आह्मी त्याजबद्दलची तजवीज करूं.

हें ऐकून बाबूराव दाभाडे यांनीं बोलण्यास सुरुवात केली. त्यांनीं नबाबास ज्या आपल्या कित्येक शर्ती सांगितल्या त्यांतच सुरत अठ्ठाविशी-पैकीं चौदा महाल आमचेकडे देऊन सर्व सुरत इलाख्यांत आमचा चवथाईचा हक्क असावा, या दोन शर्ती घातल्या व साफ सांगितलें कीं, याप्रमाणें तुमचेकडून न होईल तर आह्मी तुह्मांस महाराजांच्या आज्ञेप्रमाणें साताऱ्यास घेऊन जाऊं.

बिचाऱ्या नबाबाचें जीवित आमच्या या तरुण नायकाच्या चिमटींत सांपडलें असल्यामुळें त्यानें यांचें बोलणें मोठ्या खुषीनें मान्य केलें व तेथच्या तेथेंच १४ महालांच्या व चौथाईच्या सनदा छत्रपतींच्या नांवच्या करून दिल्या.

नबाबानें दाभाड्यांच्या ह्मणण्याप्रमाणें सर्व करून दिलें, तरी ते बोलून चालून मुसलमान पडल्यामुळें त्यांचा कोणी भरंवसा धरावा, हें मनांत आणून, बाबूराव दाभाडे हे नबाबास उघड ह्मणाले, तुह्मी

मुसलमान भाई, तुमच्या बोलण्यांत बोल फारच क्वचित असावयाचा, सबब आह्मी आपल्या फौजेंत जाऊन पोंचेपर्यंत आम्हास कोणत्याही रीतीनें अपाय व्हावयाचा नाहीं, ही जोखीम तुह्मी पतकरली पाहिजे व नुसती पतकरून देखील चालावयाचें नाहीं, पण आह्मी सुरक्षित ठिकाणीं जाईपर्यंत तुमच्या खाशापैकीं आम्हा बरोबर कोणी तरी ओलीस असलें पाहिजे.

हे सेनाखासखेल यांचे शब्द ऐकल्याबरोबर नबाबानें कुराणावर हात ठेवून सांगितलें कीं, आह्मा कडून असा दगा खचित व्हावयाचा नाहीं. तुह्मी आपल्या गोटापर्यंत खुशाल जावें. तुमचा भरंवसा पटण्याकरितां मी आपला थोरला मुलगा तुमच्या स्वाधीन करून ठेवितों. असें ह्मणून त्यानें लागलीच आपल्या मुलास बाबूराव दाभाडे यांच्याबरोबर जाण्यास सांगितलें.

नबाबाचा मुलगा आपल्या स्वाधीन झाल्यावर दाभाड्यांनीं त्याचा हात आपल्या बारागिराच्या हातीं दिला आणि नंतर यांनीं नबाबाची चिकाटी सोडली!

बाबूराव दाभाडे म्हणून १५।१६ वर्षांचा एक मराठी बछडा सुरत शहरांत पहाटे येऊन त्यानें किल्ल्यावर मराठ्यांचें निशाण फडकवून दिलें व नबाबाची मानगुटी आपल्या हातांत धरली असून नबाबाजवळून आपल्या धन्या करितां चौथाईच्या व १४ महालांच्या सनदा घेतल्या, वगैरे इत्थंभूत

वर्तमान सर्व शहरभर पसरलें. त्यांतही सर्वांस आश्चर्य हें वाटे कीं, हा एवढासा मुलगा केवळ ३६० स्वार बरोबर घेऊन येऊन नबाबा जवळून पाहिजे तसे करार करून घेतो हें आहे तरी काय? आणि असा पराक्रमी पुरुष असेल तरी कसा!! सर्व सुरतवासी लोकांच्या मनांत ही हुरहुर सारखी लागली असल्यामुळें बाबुराव दाभाडे नबाबास सोडून किल्ल्याबाहेर पडल्यापासून ते आपल्या गोटात येऊन पोंचेपर्यंत मध्यंतरीं तीळ ठेवण्यास जागा नाहीं, इतकी लोकांची गर्दी या बहादराचे दर्शन घेण्यास जमली होती. आणि वय तर अगदींच लहान व कृत्य मात्र अलौकिक केलेलें पाहून सर्व लोकांस मोठें कौतुक वाटलें.

अगोदरच गुजराथी लोक जात्या भोळवट असल्यामुळें त्यांस एकाद्याचें असें अलौकिक कृत्य पाहून मोठा अचंबा वाटतो आणि तशातही ही अल्पवयस्क खपसूरत मूर्ती व तिचा अनुपमेय पराक्रम हीं पाहून तर त्या लोकांस हा पराक्रमी पुरुष खचित ईश्वर अंशी आहे असें वाटलें व नुसतें वाटलें एवढेंच नव्हे तर हजारो लोकांनीं या आमच्या तरुण वीर पुरुषावर सोन्या रुप्यांच्या पुष्पांची वृष्टीही केली!

अशा जयघोषानें सवाई बाबुराव दाभाडे सेनाखासखेल यांची छोटेखानी पण विजयी स्वारी शहरच्याबाहेर येऊन आपल्या मुक्कामास दाखल झाली.

इकडे हा पराक्रमी वीर सातान्या पासून सुटून सुरतेस पोंचपर्यंत छत्रपति शाहु महाराज स्वस्थ होते असें नाहीं. त्यांनीं हा पोरसवदा दाभाडा छातीस हात लावून बाणासारखा सगाणत सुरतेस गेला, हें पाहून त्याच्या साह्यार्थ त्याच्या मागोमाग लागलीच सवाई बाबूरावांचे वडील बंधु यशवंतराव दाभाडे सेनापति यांस ससैन्य रवाना केलें. यशवंत-राव दाभाडे बाबूरावाच्या मागोमाग दरकुच दरम-जल करीत चालेल असतां बाबूरावांनीं सुरतेस मोठी मसलत करून नबाबाचा मुलगा ओलीस घेऊ-न परत आपल्या गोटांत येऊन दाखल होतात तों सेनापति हे बाबूरावाच्या गोटांस येऊन मिळाले. मग त्या आनंदास काय विचारतां ? अगोदरच सुरते-स झालेल्या मर्दुमकेनें बाबूरावाची मुखश्री तेजःपुंज झाली होती आणि तशांत कळकळ बाळगणाऱ्या धन्या कडून कुमक येऊन पोंचली व ती कुमकही परक्या बरोबर नसून सख्ख्या वडील बंधू बरोबर ! मग काय विचारावें ? बाबूरावास वाटलें कीं यावेळीं जरी खुद्द यमराज आपल्या सर्व परिवारासह आ-पल्या धन्याकडे वांकड्या डोळ्यानें पहाण्याची छाती करील, तरी देखील त्याची छाती विदारण क-रण्यास मी खचित समर्थ होईन. मग बिचाऱ्या सुरतकर नबाबाची ती कथा काय ? असो.

सुरतच्या नबाबानें बाबूरावास दक्षिणेतून आलेली ही मदत पाहून व तीही सवाई बाबूरावाच्या वडील

भावाबरोबर आहे, असें ऐकून त्यानें ठरलेल्या तहनाम्यांत ज्या अटी कबूल केल्या होत्या त्या तावडतोब पुऱ्या करून दिल्या, एवढेंच नव्हे, तर यानें या उभयतां बंधूंस अनेक मेजवान्या व मौल्यवान पोषाक देऊन मोठ्या आनंदभरानें माघारे उलटाविलें.

येशवंतराव व बाबूराव दाभाडे याप्रमाणें विजयी होऊन उलटते वेळीं त्यांनीं खुद्द सुरतेस आपला एक अम्मलदार ठेवून सुरत आठ्ठाविशींपैकीं मिळविलेल्या १४ महालांचा व खानदेशांत जो प्रांत यांच्या ताब्यांत होता त्याचा बंदोबस्त नीट रीतीनें लावून उभयतांही सातारयास महाराजांच्या दर्शनाकरितां येऊन दाखल झाले.

श्रीमंत शाहुछत्रपति यांस दाभाड्यांच्या या विजयाची साद्यंत हकीकत पूर्वींच श्रुत झाली होती. त्यावरून त्यांनीं दाभाडे येत त असें जेव्हां ऐकलें, त्या वेळीं दरबारची मंडळी बरोबर घेऊन ते उभयतां बंधूंस सामोरे आले. अर्थांत पदरच्या मनुष्याचा अशा रीतीनें गौरव करून त्यांस उत्तेजन द्यावयाचें ही जी पुरातन पासूनची रीति ती शाहुमहाराज पूर्णपणें जाणतच होते.

शाहुमहाराजांनीं अशा रीतीनें येशवंतराव दाभाडे सेनापति व सवाई बाबूराव सेनाखासखेल यांस दरबारांत नेऊन त्याच वेळीं महाराजांनीं दाभाड्यांच्या पायांत सोन्याचा तोडा घातला. व जरीची अबदागीर बक्षीस दिली.

सोन्याचा तोडा व अबदागीर हीं नुसतीं मानाचीं पानें झालीं. शाहुमहाराज असे अनुदार कधींच नव्हते कीं, एकाद्या आपल्या पदरच्या मनुष्यानें एकादें अलौकिक कृत्य केलें असतां ते त्याचें समाधान नुसत्या पदवीनें किंवा एकाद्या चिल्लयानें करतील ! त्यांनीं बाबूराव दाभाड्यांची मर्दुमकी पाहून लागलीच बाबूराव दाभाडे यांस पांच लाख रुपयाची जहागीर वंशपरंपरेनें करून देण्याचा निश्चय केला. शाहुमहाराजांनीं आपल्या कर्तव्यास अनुसरून पांच लाखांची जहागीर करून देण्याचा विचार केला हें खरें, पण आमचे बाबूराव दाभाडे असे कधींच हापापलेले नव्हते कीं, सांपडेल तें पदरांत पाडूनच घेतील ! त्यांनीं महाराजांस लागलीच विनंति करून कळविलें कीं, मला महाराजांनीं कांहींच कमी केलें नाहीं. माझ्या हातून महाराजांचें एकादें काम झालें, असें जर महाराज ह्मणत असतील तर ते महाराजांच्या चरणांचे प्रताप आहेत असें मी समजतों. महाराजांची जहागीर देण्याची इच्छाच असेल तर ती वडील बंधूंच्या नावें करून द्यावी.

महाराजांनीं बाबूराव दाभाड्याचें हें बंधुप्रेम पाहून त्यांस मोठें आश्चर्य वाटलें. लहान वय असून छाती केवढी, शूरत्व कमलें दांडगें व त्या गुणांस शोभणारें बाबूराव दाभाड्याचें हें औदार्य अवलोकन करून शाहु महाराज मोठे थक्क झाले.

आणि त्यांनीं हा पुढें मराठी राज्याच्या विस्तारास अति उपयोगी पडेल अशी मनांत गांठ मारून ठेविली. व बाबूराव दाभाड्याच्या इच्छेप्रमाणें त्यांनीं यशवंतराव दाभाडे यांच्या नांवच्या जहागिरीच्या सनदा तर करून दिल्याच, पण त्या शिवाय कसबे नवखाव उंबरें येथील जकात व मोकासा दाभाड्यांच्या घराण्यास वंश परंपरेनें करून दिला. त्याचप्रमाणें खानदेश, बागलाण व कर्नाटक वगैरे प्रांताचे मोकासेही फौजेच्या खर्चा करितां करून दिले.

या प्रमाणें सवाई बाबूराव यांनीं आपल्या धन्याच्या अपमानाचा मोबदला सुरतच्या नबाबास देऊन आपल्या महाराष्ट्राच्या उज्वल कीर्तीचा ध्वज सर्व गुजराथ भर उभारला. इतक्या लहान वयांत इतकी मसलत व एवढें धारिष्ट एकाद्या मनुष्याच्या अंगांत उपजत उत्पन्न होणें हें खरोखरीच देशोन्नतीचें चिन्ह समजावयाचें. आज आपल्यास अशा गोष्टी नुसत्या लिहिण्यास किंवा वाचण्यास मोठ्या मौजेच्या व अगदीं सोप्याशा वाटतात हें खरें, पण एकट्यानें दोन तीनशें स्वार बरोबर घेऊन सुरतसारख्या बंदोबस्ताच्या शहरांत आपला रिघाव करून तेथील नबाबास एकटा गांठून त्याच्यापासून आपले दस्तक परत घेणें व धन्याच्या अपमानाबद्दल अणखी मुलूख मिळविणें, आणि पुनः भरशहरांतून शत्रूच्या हातून निर्भयपणानें आपल्या जाग्यावर

परत येणें, हें किती भयंकर, किती धोक्याचें व केवढ्या धिटाईचें काम आहे, याचा विचार करूं लागलें ह्मणजे या काळांत खचित असें वाटतें कीं, असले पराक्रम करणारे पुरुष खचित मनुष्य नसून हिंदु लोकांच्या कल्याणार्थ हे देवांचेच अवतार तेवढ्यापुरते उत्पन्न झाले होते!

बरें इतकेंही करून एवढ्या मोठ्या महत्कृत्याचा ताठा तरी असावा कीं नाहीं? पण छे! कांहीचाही ताठा नसून उलट धन्याच्या पायांचीही पुण्याई असें ह्मणून सर्व थोरवी धन्यास द्यावयाची अशी ज्यांची उदारबुद्धि, त्यांस ईश्वरी अवताराशिवाय दुसरें काय ह्मणावयाचें?

असो. याप्रमाणें आमच्या दाभाड्यांनीं मोगल्यांच्या अपमानाचें उसनें फेडून मराठी राज्याचा विस्तार केला. हा विस्तार येथेंच थांबला असें नसून आमची दाभाडे मंडळी अद्यापही ह्या वसुंधरेवर पुष्कळ फडकावयाची आहे; आणि तें त्यांचें फडकणें नुसत्या पुरुषांतच नसून या घराण्यांतील स्त्रिया देखील शत्रूंच्या नरडीचा घोट घेऊन आपल्या राज्याचें ऐश्वर्य वृद्धिंगत करणाऱ्या होत्या असें आपल्यास आढळेल. हें मनोवेधक सुचरित्र वाचकांस पुढील भागांत आढळेल.

# भाग सातवा.

## दाभाड्यांची अमदाबादेवरील स्वारी.

सवाई बाबूराव दाभाडे यांणी सुरतेच्या नबाबाच्या उद्दामपणाचा त्यास मोबदला देऊन परत आले, ते वडील बंधु येशवंतराव यांसह कांहीं दिवस साताऱ्यासच राहिले होते. मराठे लोकांची सत्ता दिवसेंदिवस वृद्धिगत होत असून मुसलमानांचा जरी ऱ्हास होत चालला होता. तथापि जागजागीं मुसलमानांचे टापू बरेच होते. व त्यांतून न कित्येक मुसलमान ऐषारामाविरहित राहून ज्यांच्या आंगीं थोडासा मुसलमानी पीळ अवशिष्ट राहिला होता, ते संधि सांपडली कीं, हळूच डोकें वर करण्यास कमी करीत नसत. त्याचप्रमाणें दाभाड्यांनीं जरी सर्व गुजराथेंत आपला अम्मल बसविला होता, तथापि मधून मधून त्यांच्या अमलांतही मुसलमानांचे कांहीं बुधे राहिलेले होते. या बुधांपैकींच अमदाबादेस एक मुसलमानांचें ठाणें प्रथमपासून कायमच होतें. या ठाण्याचा ठाणेदार कोणी जोरावरखांबाबी नांवाचा होता. दाभाड्यांचें कोणी माणूस गुजराथेंत नाहीं व सर्व अंमल मुकत्याराच्या मार्फत चालला आहे, ही संधि पाहून जोरावरखांबाबीनें गुजराथेंतील दाभाड्यांची ठाणीं हळू हळू उठविण्याची खटपट चालविली. ही बा-

तसी सातारच्या दरबारापर्यंत येतांच सुरतेच्या स्वारी नंतर दुसऱ्याच सालीं छत्रपति महाराजांनीं येशवंतराव व बाबूराव दाभाडे यांस अमदाबादेची स्वारी सांगितली.

या स्वारी बरोबर महाराजांनीं फौजफाटा वगैरे यथास्थित देऊन दाभाड्यांचा चांगला बंदोबस्त केला होता. तथापि उभयतां दाभाड्यांचें वय लहान असून स्वभावही धाडशी व हूड असल्यामुळें खुद्द महाराजांनीं उभयतां वीरांची वीरमाता व कैलासवासी खंडेराव दाभाडे यांची वीरपत्नी उमाबाई यांस चिरंजीवांबरोबर जाऊन त्यांस अवाडीस न जाऊं देण्याचा वगैरे बंदोबस्त ठेवण्याची आज्ञा केली.

राजाज्ञेप्रमाणें उमाबाई आपल्या उभयतां चिरंजीवांसह अमदाबादेच्या स्वारीस मोठ्या आनंदानें निघाल्या. त्या दरकुच दरमजल अमदाबादेस येऊन दाखल झाल्या.

अमदाबाद शहर साबरमती नदीच्या कांठीं असून याच्या भोंवती मजबूत व भव्य असा एक कोट होता व तो अद्यापिही कायम आहेच. या कोटास चार बाजूस चार वेशी असून मधून मधून लहान लहान खिडक्याही आहेत. पूर्वीं मुसलमानांचें हें बरेंच महत्वाचें ठाणें असल्यामुळें याचा बंदोबस्तही चांगल्या प्रकारें ठेविलेला असे. तात्पर्य अमदाबाद शहरची गणना शहरांत करण्यापेक्षां यास

चांगला मजबूद भुईकोट किल्लाच ह्मणणें चांगलें शोभेल.

उमाबाई दाभाडे यांच्या फौजेचा तळ अमदाबाद शहरापासून कोस दोन कोसाच्या अंतरावर येऊन पडला. आपल्यावर दाभाडे चढाई करून आले व त्यांच्या फौजेवर अधिपति स्त्री आहे, असें जोरावर-खां यानें पाहून मोठ्या ताठ्यानें व अहंपणानें उमाबाईस निरोप पाठविला कीं, " तूं बायको म-नुष्य असून रंडकी आहेस, तुझीं मुलें वयानें ल-हान आहेत. आह्मी मुसलमान बच्चे आहों, को-णत्या वेळीं काय करूं व कशी अब्रू घेऊं याचा नेम नाहीं. या कारितां तूं आलीस तशीच बऱ्या बोलानें माघारें जावेंस हें ठीक आहे. नाहींपेक्षां तूं आपला भलताच परिणाम करून घेशील. "

हा घमेंडीचा व दुभंपणाचा निरोप ऐकून कपु-राच्या राशीस जोत लावल्याबरोबर जसा एकदम भडका होतो, त्याप्रमाणें उमाबाईचा क्रोधाग्नि खव-ळून जाऊन तिनें एकदम आपल्या पदरच्या सर्व-सरदारांस पाचारण केलें; आणि सर्वांचें दरबार भरवून त्यांच्यापुढें हळदकुंकू व बांगडया ठेवून सां-गितलें कीं, " मी अस्सल मराठे जातीची बायको-मनुष्य असतां ज्या अर्थीं पठाणानें बेअब्रूची व दुभं-पणाचीं पत्रें लिहिलीं आहेत, त्या अर्थीं मी अम-दावादच्या भद्रांत गेल्याशिवाय अन्न ग्रहण करणार नाहीं ही माझी प्रतिज्ञा आहे. तुह्मी आमचें अन्न

खाऊन वाढलां आहांत, करितां जर त्याची कांहीं शरम तुम्हांस वाटत असेल तर तुह्मीं आमचे बरोबर यावें. मरणास भिणें हें मराठ्याचें काम नाहीं. आणि जर तुह्मी मरणास भीत असाल तर हें हळद-कुंकू व बांगड्या तुमच्या पुढें ठेविल्या आहेत त्यांचा स्वीकार करून तुह्मी आपल्या मुलामाणसांत जाऊन स्वस्थ रहावें.

वीर पत्नी व वीरमाता उमाबाई हिचें हें अवसानाचें व निकराचें भाषण ऐकतांच सर्व सरदारांचे वीरश्रीने बाहू स्फुरण पावून त्यांनीं एकपमय वच्छेदें करून या शत्रुहनन कर्त्रीस मोठ्या नम्रपणानें मुजरे केले आणि साफ सांगितलें कीं, " उत्पन्न झालेल्या प्राण्यास मरण हें आहेच, पण तें मरण मुंगीच्या मौतीनें येऊन किड्यांप्रमाणें हातरुणावर तरमळून मरण्यापेक्षां आपल्या अब्रूच्या संरक्षणार्थ मरणें इहपर लोकींही सुखावहच आहे. व ज्या अर्थी आह्मी आपलें निमक खालें आहे त्या अर्थी आह्मी तुमच्या करितां व आपल्या देशाकरितां शत्रूशीं लढून मरूं, अशी आमची प्रतिज्ञा आहे. ही आमची प्रतिज्ञा सर्वसाक्षी भगवान शंकरास नेवो ! " असें म्हणून सर्व योध्यांनीं आपापलीं हत्यारें सरसावून " हर हर महादेव " म्हणून मोठा शब्द केला.

आपल्या पदरच्या लोकांची ही हिमायत व आवेश पाहून उमाबाईस फार संतोष झाला. त्यांनीं

लागलींच पेषकवज, ढाल तरवार वगैरे पंच हत्यारें बरोबर घेऊन त्या हत्तीवर स्वार झाल्या आणि आपल्या अंबारीस चिकाचे पडदे लावून त्या समरंगणात आपल्या उभयतां शूर बछड्यांस बरोबर घेऊन प्राप्त झाल्या.

या वेळीं उमाबाई दाभाडे यांचें स्वरुप लोकोत्तर दिसत होतें. उतार वय तर खरेंच, पण शरीराचा बांधा मजबूत, रंग निमगोरा, डोळे सतेज, कपाळ भव्य, अंगावर डागदागिने बेताचेच, पण उंची, पोषाग पांढरा शुभ्र व साधा आणि तलवार तमंचादि पांच हत्यारें कमरेस लटकलेलीं, अशी ती उमाबाई दाभाडी त्या वेळीं जणुं महिषासुरादि दुष्ट दैत्यांचा संहार करून गायी ब्राह्मणादिकांचें संरक्षण करण्याकरितांच प्रत्यक्ष आदिमाता चंडिकाच अवतीर्ण झाली आहे असा भास होई! हत्तीच्या दोहो बाजूस दोघे चिरंजीव यशवंतराव व बाबूराव दाभाडे सेनापति हे इतके शोभा देत असत कीं, जणूं या जगदंबिकेचे हे चक्र रक्षकच आहेत! यांच्या भोंवतीं सर्व मराठी सैन्याचा मोठा समुदाय होता तो समुदाय जणुं महिषादि दुष्ट व छलक असुरांचा विध्वंस करणाऱ्या या असुरमर्दिनीच्या साह्यास तेहत्तीस कोटी देव आपापल्या अंशानेंच अवतीर्ण झाले आहेत कीं काय असा भास होई!!

असो. याप्रमाणें उमाबाईच्या फौजेची सर्व सिद्धता झालेली पाहून अमदाबादच्या मुसलमानांच्या

काळजांचें अगोदरच पाणी होऊन गेलें. तथापि ते जातीचे मुसलमान व तशांतही पठाण पडल्यामुळें ते आपला मुख्य जोरावरखां व बी यास पुढें करून मोठ्या जमावानिशीं समरंगणांत येऊन दाखल झाले.

जोरावरखां कांहीं हलका सलका मनुष्य नव्हता. तो चांगला फौजबंद तर होताच, पण त्याचें बहुतेक सैन्य कडव्या पठाण जातीचें असून चांगलेंच शिकलेलें होतें. शिवाय दाभाड्यांची फौज आपल्यावर चाल करून येत आहे, हें त्यानें ऐकल्यापासून तर फौज वाढविण्याचा त्यानें इतका सपाटा चालविला होता कीं, उमाबाई दाभाड्याशिवाय इतर कोणाची ही त्याचे पुढें डाळ शिजली नसती. परंतु उमाबाई वीरपत्नी व वीर माता असल्यामुळेंच त्याचे पुढें तिचा टिकाव लागला.

याप्रमाणें उभयतांचीं सैन्यें एके ठिकाणीं मिळाल्यावर मग काय विचारावें ? लगलींच लढाईस आरंभ झाला. सुमारें तीन चार तास लढाई इतक्या निकराची झाली कीं, कोणाचा जय व कोणाचा पराजय होतो, याचा अदमासच लागेना. एकंदर दोन्हीकडील पक्षांचे मिळून सुमारें १५०० लोक समरंगणीं पडले ! दाभाड्यांच्या फौजेनें देवीच भोपे लोक देवीपुढें बकऱ्यांची जी अवस्था करितात तशी आपल्या तरवारीनें शत्रूच्या लोकांची दशा उडवीत होते. अखेरीस जोरावरखां याचें कांहींच

चालेनासें होऊन तो आपल्या फौजेसह माघारा परतून अमदाबाद तटाच्या आंत शिरला आणि तटाचे दरवाजे त्यानें लावून घेऊन आपण आतां सुरक्षित झालों असें मनांत समजून स्वस्थ राहिला.

इकडे उमाबाई दाभाडे यांची प्रतिज्ञा कशी अघोर होती, हें वर सांगितलेंच आहे. आमदाबादेच्या भद्रांत—राजवाड्यांत—गेल्यावांचून त्यांस अन्नग्रहण करावयाचें नव्हतें. सबब शत्रूनें दाराच्या कड्या-लावून जरी आपल्यास कोंडून घेतलें, तथापि खुद्द दाभाड्यांस किंवा त्यांच्या फौजेस जोरावरखांचीं मुळें पाळें उपटून त्याचा विध्वंस केल्याशिवाय चैन को-ठून पडणार ! शिवाय त्या शिखानष्ट दुष्टानें अब-लाजनांस ज्या मर्यादेनें बोलावयाचें त्याचेंही उल्लं-घन केल्यामुळें त्याचे ते कठोर वाग्बाण प्रत्येक मराठी शिपायाच्या अंतःकरणास शल्यवत टोंचत असल्यामुळें शत्रूच्या नरडीचा आपण केव्हां घोंट घेऊं असें सर्वांस होऊन गेलें होतें.

या सर्व गोष्टींमुळें जोरावरखां जरी मोठ्या बंदो-बस्तांत ह्मणून गेला, तथापि मराठ्यांच्या फौजेनें त्याचा पिच्छा सोडला नाहीं. अमदाबाद कि-ल्ल्याचे तट उंच होते व यांस शिड्या वगैरे लावून चढण्यास अवकाश नव्हता, सबब दाभाड्यांच्या लोकांनीं क्षणही वांया न दवडतां रणांत जीं ह-जारों प्रेतें पडलीं होतीं त्या प्रेतांचे तटाच्याजवळ मोठमोठे ढीग रचून तटावरून शत्रूच्या फौजेचा

एकसारखा मारा चाललेला असतांही त्या प्रेतांच्या राशीवरून हे रणशूर शिपाई आपल्या धण्यांनीसुद्धां आमदाबादच्या तटावर " हरहर महादेव " करीत चालले व त्यांनीं तो दुर्घट तट आपल्या पूर्ण कब-जांत घेतला.

वाचकहो, असली भयंकर हकीगत नुसती ऐ-कण्यास किंवा तुमच्या सारख्यांनीं वाचण्यास व आमच्या सारख्यांनीं लिहिण्यास अगदीं सोपी व मनोवेधक आहे असें वाटतें खरें ना? पण तुह्मी आह्मी आलीकडे जर एकादी तोफ सुटलेली दुरून ऐकली किंवा बंदुकीचे नुसते वायबार ऐकले तर त्या वायबारानें आपले अंतःकरणांत कसें धस्स होतें, याचा अनुभव नित्य घेतांना? पण या हातघाईच्या लढाईंत बंदुकांच्या गोळ्यांचा व तोफांच्या गोळ्यां-चा वर्षाव व्हावयाचा व तरवारी आणि भाले यांच्या तीक्ष्ण धारा शरीरांत शिरावयाच्या व आपल्या आ-जूबाजूंस आपल्या सोयऱ्या धायऱ्यांची व इष्टमि-त्रांचीं प्रेतें पटापट पडावयाचीं, अशा कठीण प्रसं-गांत आपला हेतु साधण्याकारितां नुसती लढाईच करावयाची नसून, प्रसंगोपात आपल्या त्या प्रियकर बांधवांचीं प्रेतें आपल्या हातानें फरफरावीत आणून त्यांचे एकावर एक ढीग रचावयाचे आणि ते ढीग आपल्या पायांनीं चढून जाऊन शत्रूंचा किल्ला हस्तगत करावयाचा हें काम किती दुर्घट, किती कठोरपणाचें, किती धाडसाचें व किती शौर्याचें आहे

याचा नुसता विचार तर करून पहा ! आणि असलें दुर्घट काम आपल्यापैकीं एक अबला स्त्री करीत होती, हेंही ध्यानीं आणा ! ह्मणजे अशा केवळ दुर्घट दुर्गांचेच तुह्मी सरळ वारस आहां असें तुह्मांस आठवून तेव्हांच्या त्या बांगड्या भरणाऱ्या स्त्रियांच्या पोटीं आपण ओंठावर पळीभर मिशांचा भार वहाणारे पुरुष व्यर्थ जन्मलों, याची तुह्मांस लाज वाटेल ! ! आणि याचकरितां मराठ्यांच्या उदयकाळीं देवांशानेंच मराठे लोक अवतीर्ण झाले होते असें आह्मीं ह्मटलें आहे. अस्तु.

वर सांगितल्या प्रमाणें दाभाड्यांची फौज तटावर गेल्यामुळें तटवाले लोक भराभर त्यांच्या स्वाधीन झाले. शहरांत निर्धास्त ह्मणून राहिलेला जोरावरखां तर महाराष्ट्रीयांचें हें अघोर आणि अनन्वित कृत्य पाहून द्विधांतःकरण होतसाता अमदाबाद सोडून त्यानें पिराणपट्टणची वाट धरली व दाभाड्यांच्या फौजेनें अमदाबादेस आपलीं ठाणीं बसवून सर्वत्र शांतता केली.

इतका हा सर्व प्रकार झाल्यावर सेनापति दाभाडे यांनीं गुजराथचा बंदोबस्त आपला विश्वासू नोकर पिलाजी गायकवाड यास सांगून खुद्द अमदाबादेस अपाजी गणेश यांस ठेवून व सर्व मुलुखाचा बंदोबस्त करून देशीं येण्यास परतले.

उभयतां सेनापति दाभाडे दरकुच दरमजल करीत साताऱ्यास दाखल झाले. ही बातमी श्रीछत्र-

पति शाहुमहाराज यांस कळतांच ते या विजयाबि-मूर्तीस स्वतः सामोरे येऊन त्यांचा त्यांनीं योग्य सन्मान राखला. आणि त्याचवेळीं दरबार भरवून या मोहिमीबद्दल दाभाड्यांस काय बक्षीस द्यावें याचा विचार दरबारांत निघाला.

पूर्वीं दाभाड्यांच्या पुरुषांनीं ज्या मर्दुमक्या केल्या त्याबद्दल त्यांस पदव्या, पोषाक, आलंकार, इनाम, हक्क, जहागिरी वगैरे बक्षिशीचे जेवढे म्हणून प्रकार होते तेवढे सर्व प्राप्त झालेलेच असल्यामुळें यावेळीं सेनापति दाभाडे यांस काय बक्षीस द्यावें याचा दरबारांत मोठा विचार पडला. तशांतही ही मर्दुमकी केवळ दाभाड्यांच्या घराण्यातील एका रणशूर अबलेनें गाजविली असल्यामुळें तर तिचा तो अघटित प्रताप ऐकून सर्व दरबार चित्रासारखें तटस्थ होऊन बसलें! कोणासही कांहीं सुचेना.

अखेर श्रीमंत महाराजांनींच अशी तोड काढली कीं, ज्या अर्थीं दाभाड्यांच्या पुरुष मंडळीस सर्व प्रकारच्या पदव्या व मानपान मिळालेले आहेत, त्या अर्थीं आतांच्या मोहिमेबद्दल महान पराक्रमी उमाबाईसच योग्य इनाम द्यावयाचें. असा विचार करून महाराजांनीं सोन्याचे दोन तोडे करून उमाबाई दाभाडे यांच्या पायांत घातले व तेव्हांपासून त्यांच्या घराण्यांतील स्त्रियांस पायांत सोन्याचे तोडे घालण्याचा अधिकार परंपरेनें करून दिला.

हल्लीं कित्येक बडे संस्थानिक आपल्या स्त्रियांच्या पायांत सोन्याचे तोडे करून घालतात, पण ती निव्वळ देणगी आहे असे समजावयाचें. कारण हा अधिकार छत्रपति राजाकडूनच मिळाला पाहिजे.

दाभाड्यांचा याप्रमाणें मानसन्मान करून शाहूछत्रपति महाराजांनीं सेनापति दाभाडे यांस वस्त्रें भूषणें व हत्ती घोडे वगैरे देऊन त्यांची तळेगांवास रवानगी केली व चार महिने बरसातीचे तेथेंच विसावा खावा अशी त्यांस आज्ञा दिली. राजाज्ञेप्रमाणें दाभाड्यांची सर्व मंडळी तळेगांवी येऊन दाखल झाली.

येथपर्यंत दाभाडे सेनापति यांच्या घराण्याचा दिवसेंदिवस भरभराटच होत गेला. पण पुढें सृष्टीच्या नियमाप्रमाणें सर्व गाडें फिरलें जाऊन या सोन्यासारख्या घराण्यास कशी दशा प्राप्त झाली हें वाचकांस समजून सांगण्याचें आमच्या प्रारब्धीं येत आहे. पण लिहिणारास किंवा वाचणारास कसाही सुखदुःखाचा प्रसंग आला तरी तो नेटानें तसाच निभावून न्यावा लागतो, या तत्वास अनुसरूनच आतां आपण सेनापति दाभाडे यांची पुढील हकीगत पहाण्यास लागूं.

# भाग आठवा.

( ऱ्हास काल—बेमानपणा व दुही )

मागील भागांत उमाबाई दाभाडे व त्यांचे उभयतां पुत्र यशवंतराव व बाबूराव दाभाडे सेनापति सेनाखासखेल यांच्या स्वाऱ्या साताऱ्यास मोठें मानमरातब पावून तळेगांवास आल्या, हें वृत्त कथन केलेंच आहे. राजाज्ञेप्रमाणें चातुर्मासपर्यंत सर्व मंडळी तळेगांवीं राहिल्यावर दाभाड्यांच्या खानदेशांतील सत्तेंत कांहीं बखेडा झाला असें ऐकिवांत आलें. त्यावरून सवाई बाबूराव सेनापति सेनाखासखेल हे तिकडील बंदोबस्ताकरितां लागलीच चालते झाले.

दैवगति मोठी विलक्षण आहे. उघड शत्रू पुरवतो, पण कपटी मित्र पुरवत नाहीं असें जें महात्म्यांचें ह्मणणें आहे तें अक्षरशः खरें आहे यांत शंका नाहीं. उघड शत्रू असेल तर आपल्या शक्तीप्रमाणें आपण त्याचा पाडाव करूं किंवा तो आपला पाडाव करील एवढेंच काय तें, पण त्यांत कपटाचा लवलेश नसल्यामुळें अपघाताची भीति बाळगण्याचें कांहीं एक कारण नसतें. तशी गोष्ट कपटी मित्राच्या ठिकाणीं लागू पडत नाहीं. ज्या दाभाड्यांच्या पुरुषांनीं लक्षावधि शत्रूंच्या नरड्या फोडल्या, ज्यांनीं रणेंच्या रणें माजवून शत्रूस दे

प्राय धरणी ठाव केलें, ज्या दाभाड्यांनीं सर्व हिंदु-स्थानभर रंवदळ घालून या पवित्र आर्यभूमीवर म्लेंछांची पायपैस केली, ज्या दाभाड्यांच्या घराण्यांतील सवाई बाबूराव दाभाडे सेनापति यांनीं १०१२ लोकांसह जाऊन सुरतेच्या नबाबाच्या छातीवर बसून मराठ्यांचा सपाटा कसा असतो हें दाखविलें, ज्या बाबूरावानें थोरल्या बाजीरावासारख्या वीर पुरुषास आपल्या बाहुबलानें तोंडांत बोट घालण्यास लाविलें, ज्या बाबूरावानें आपल्या मातेच्या संगती अमदाबादेस जाऊन अमदाबादेची गढी प्रेतांची रास करून काबीज केली, ज्या बाबूराव दाभाड्यास कोणी हूं झटलें कीं तो चित्त्यासारखा उडत असे, तोच पराक्रमी, रणशूर व कीर्तिमान, निमकहलाल सेनापति सेनाखासखेल अखेर या कपटजालांत सांपडून केवळ अपघातानें मृत्युमुखीं पडला ! !

दाभाड्यांच्या घराण्यांत जे एकापेक्षां एक वीर उत्पन्न झाले ते पुष्कळांस न बघवल्यामुळें यांचा पुष्कळ लोक कशा तरी रीतीनें घात करावा असें मनांत बाळगीत होतेच. या वेळीं सवाई बाबूराव दाभाडे यांची काळ वेळ भरली गेल्यामुळें ते आपल्या खानदेशच्या मुलखाची व्यवस्था पहाण्यास गेले असतां त्यांची स्वारी मौजे रामेश्वर देवळें प्रांत मेहनरे येथें येऊन दाखल झाली. आणि त्या मुक्कामीं कोणा दुष्ट चांडाळानें त्यांच्या अन्नांत विष

कालविलयामुळें दोन तीन घटकेच्या अवकाशांत या सृष्टींतील मोहोरा एकदम नाहींसा होऊन सर्व शून्याकार झाला ! !

हाय, हाय ! काय आमच्या देशाचें दुर्भाग्य कीं, जेथें बाबूराव दाभाड्यासारखे वीर पुरुष केवळ प्रति धनंजयच त्यांनीं आपल्या मातेच्या पोटीं उत्पन्न होऊन तिची कूस आपल्या नांवा लौकिकानें व बाहुबलानें सुशोभित करावी आणि असा मोहोरा कोठें चमकतो न चमकतो, आपल्या देशबंधूस परकीय सत्तेंतून काढतो न काढतो, तोंच त्याच्यावर विषप्रयोगासारखें नीच काम करणाऱ्यांनीं झडप मारून केवळ आपल्या एकट्या दुकट्याच्या हिताहिताकरितां लाखो लोकांच्या तोंडास पानें पुसून बाबूरावासारखें रत्न या सृष्टींतून नाहींसें करावें यांस आह्मा हिंदु लोकांचे दुर्भाग्य नव्हे तर काय ह्मणावें ! बेहत्तर आहे कीं असे कपटपटु व नीच लोक उपजल्या बरोबर मरतील तर ! ईश्वराचा तरी केवढा चमत्कार आहे ! त्याला कां हा मोहोरा दुष्ट विषाचें अमृत करून वांचवितां आला नसता ! पण त्याच्याच मनांत जर आह्मा हिंदूंचा खेळखंडोबा करणें असेल तर तेथें कोणाचा इलाज चालणार ! असो.

आपण आतां या आपल्या कलिघाबद्दल कितीही शोक केला, कितीही विलाप केले, त्या जगन्नियंत्यास कितीही आळविलें तरी आपल्यास सवाई बाबूराव कां आतां परत येऊन आपल्या परसत्तेच्या या-

तर्नेतून सोडविणार आहे ! छे ! नांव देखील नको ! ज्यानें आह्मा पापी चांडाळाचें दुष्टाचरण पाहून अकस्मात विषप्रयोग झाल्याचें निमित्य करून परलोकीची वाट धरिली, तो कां आतां या पातकी मृत्युलोकीं येऊन आह्मा करंट्यांचें पुनः मुखावलोकन करणार ? ती शंका देखील नको ! अस्तु. आपण आपल्या आतां पुढील व्यवस्थेस लागूं चला.

आपले सवाई बाबुराव सेनापति सेनाखासखेल हे या रीतीनें पडल्याची वार्ता त्यांच्या घराण्यास येऊन पोंचल्या बरोबर त्यांच्या मातोश्रीची व वडील बंधु यशवंतराव दाभाडे यांची गति पहा काय झाली ती !

ज्या उमाबाई दाभाडीनें आपल्या उभय चिरंजीवांस संगती घेऊन आमदाबादच्या खांसाहेबांची चमडी लोंबविली, त्याच वीरमाता उमाबाईस आपला बच्चा अशा अपघातानें मृत्युमुखीं पडला ही वार्ता कळल्या बरोबर ती जी एकवार मृतवत् होऊन पडली ती तिनें पुत्र शोकामुळें पुनः मान ह्मणून वर केलीच नाही ! ती विचारी अगोदरच स्त्री जात, तशांतही वयानें वृद्ध आणि त्यांतही बाबूरावासारख्या हिऱ्यास जन्म देणारी असल्यामुळें तिची अशी दुर्दशा झाली यांत मोठेंसें नवल आहे असें नाहीं, पण पुरुषासारखा पुरुष व जात्या शूर असून शेंकडों लढाया मारलेला यशवंतराव देखील आपल्या प्रिय बंधूची दुर्वार्ता ऐकून व आपलें पाठबळ आतां गेलें असें मनांत आणून जो एकदां हतधैर्य झाला

त्यास पुनः ह्मणून अवसान आलेंच नाहीं ! ही विपरीत वार्ता ऐकून ती कळविण्याच्या हेतुनें ते जे एकवार साताऱ्यास आले तों त्यांनीं अखेरपर्यंत कां ह्मणाना सातारा ह्मणून सोडलाच नाहीं.

छत्रपति शाहु महाराजांनीं यशवंतराव सेनापति यांची पुष्कळ प्रकारानें समजून घातली, परंतु तें सर्व व्यर्थच झालें. यशवंतराव दाभाडे यांस त्यांच्या वडील स्त्री पासून झालेले त्रिंबकराव ह्मणून एक चिरंजीव होते. यांचें वय त्यावेळीं जरी लहान होतें तथापि शाहु महाराजांनीं सवाई बाबूराव दाभाडे सेनाखासखेल यांचीं वस्त्रें लागलींच त्रिंबकरावास देऊन त्यांच्या नांवास सेनाखासखेलीचें पद जोडलें.

एकदां एकाद्या देशास किंवा घराण्यास अथवा मनुष्यास ऱ्हासकाल लागला ह्मणजे चोहींकडून त्याचे सर्व ग्रह फिरल्यासारखे दिसतात. अनुकूल कालाच्या वेळीं हातांत निव्वळ मृत्तिका घेतली असतांही जसें तिचें बावनकशी सुवर्ण बनतें, त्याचप्रमाणें प्रतिकूल काळ आला असतां प्रत्यक्ष सुवर्णास नुसतां स्पर्श झाला तरी देखील त्याचे निव्वळ कोळसे बनतात. हा अनुभव आपल्यास या जगतीतलावर पावलों पावलीं येत असतां. इतकें आपलें सर्व घोडें केवळ पर स्वाधीन ह्मणजे कालाधीन असतांही प्रत्येक मनुष्य मी मी ह्मणून मिशांवर ताव देत असतो, असेंही आपल्यास आढळतें ! हें दाभाड्यांच्या घराण्याचेंच उदा-

हरण बघावांत ! प्रथम यःकश्चित गांवचा पाटील असतां अनुकूल काळ आला त्या वेळीं त्याच पाटला-चें घराणें सर्व पृथ्वीभर गाजलें; आणि आतां काला-ची कांडी पुनः फिरल्यामुळें त्याच घराण्यांतील पुरुषांस एकेक नसतें विघ्न उपस्थित होऊन त्यांचा ऱ्हास होत चालला आहे. असो.

या दाभाडयांच्या घराण्यांतील वाघासारखा डुर-कणारा बाबूराव दाभाडे मनुष्यांच्या मत्सरादि दुष्टगुणांस बळी पडला, एवढ्यानेंच या घराण्याचें नष्टचर्य संपलें नाहीं. दाभाडे सेनापति यांनीं आ-पल्या गुजराथच्या मुलखावर आपल्या वतीचा मुख-त्यार ह्मणून पिलाजी गायकवाड यांस ठेविलें होतें, हें पूर्वीं सांगितलेंच आहे. या इमानी पिलाजीराव गायकवाडास याच संधीस ह्मणजे शालिवहान शके १६५४ सालीं देवाज्ञा झाली ! या बिचाऱ्यास तरी मृत्यूनें गांठलें तें साधेपणानें गांठलें नसून मारवा-डांतील एक अभयसिंग नांवाच्या रजपुतानें याच्या-वर मारेकरी घालून यास मारलें.

दाभाड्यांनीं ज्या वेळेपासून गुजराथ पादाक्रांत केली, त्या वेळेपासून पिलाजीबुवा गायकवाड हा ते-थील बंदोबस्तास राहिला असून त्यानें आमरणपर्यंत आपल्या धन्याशीं निमक हरामी न करितां मुल-खाचा जो दरसाल वसूल व्हावयाचा त्याचा हि-शोब पिलाजीबुवा नियमानें दाभाडयांस देत असे.

दाभाडयांनीं स्वपराक्रमानें जरी गुजराथेचा मुलू-

स मिळविला होता, तथापि ते त्या मुलखाचे अ-र्थात्च मालक नव्हते मालक शाहुछत्रपतीच खरे. यामुळें गुजराथेबद्दलच्या वराता महाराजांकडून दरसाल दाभाडयांवर येतच असत; आणि जोंपर्यंत पिलाजी गायकवाड हयात होता तोंपर्यंत या वराता वेळच्या वेळीं भरल्याही जात असत.

पुढें पिलाजीबुवांचा शेवट झाल्यावर त्यांचे पुत्र दमाजीराव गायकवाड, यांस येशवंतराव दाभाडे सेनापति यांनीं गुजराथेच्या सुभ्याचीं वस्त्रें देऊन तिकडे रवाना केलें.

दमाजीराव गायकवाड गुजराथेंत गेल्यावर त्यांनीं आपल्या वडिलांचा इमानीपणा व नेक बाजूस ठेवून आपल्या धन्याशीं पुंडाई माजविली. दोन दोन वर्षांचा वसूल तसाच दडपून ठेवून त्याचा हिशेब देण्यास देखील त्यांनीं इकडे येऊं नये. असा क्रम चालविला. या त्यांच्या अनियमितपणामुळें सेनापतीस खर्चावेंचाची फार ओढ पडूं लागली. महाराजांच्या वराता सेनापतीवर होत. त्या भागविण्याचें साधन सेनापतीकडे मुळींच नसल्यानें त्या वराता ते दमाजीराव गायकवाडावर पाठवीत. पण या बेमान सुभेदारानें त्या वराता मुळींच मानूं नयेत अशी वहिवाट ठेविली ;

इतक्यांत सातारच्या दरबारांतही एक मोठी घालमेल झाली. शालिवहान शकाच्या १६६२ सन १७४० ह्या वर्षीं थोरले बाजीराव पेशवे यांस दे-

दाज्ञा झाली. व पेशवाईचीं वस्त्रें श्रीमंत शाहुमहाराज यांनीं त्यांचे वडील चिरंजीव बाळाजी बाजीराव यांस दिलीं.

जुनीं पुराणीं मनुष्यें एका मागें एक नाहींशीं झालीं ह्मणजे एकवार बसलेली घडी मोडली जाऊन नव्या नव्या गोष्टीस व कल्पनांस पूर येत असतो. त्याप्रमाणें बाजीराव पेशव्यास या घराण्याचा जो वचक होता आणि शाहूमहाराजांच्या पायांवर हात ठेवून या घराण्याचें मी नेहमीं कल्याणच चिंतीन ह्मणून जें त्यानें आपल्यास बंधन करून घेतलें होतें, तें बंधन त्याच्या मागें त्याच्या पुत्रावर मुळींच राहिलें नाहीं आणि त्यामुळें ही या घराण्याचें वेळोवेळीं नुकसानच होत गेलें. अस्तु.

तिकडे दमाजी गायकवाड दंडेलीस आले व इकडे राजदरबारांत मोठी घालमेल होऊन सर्व बस्तान निराळ्याच स्वरूपाचें झालें, असें पाहून यशवंतराव सेनापति यांनीं गुजराथेवर कोणी तरी दुसरा सुभा पाठवावा अगर तिकडील बंदोबस्त स्वतः जाऊन करावा असा विचार मनांत आणून खानदेशचें मार्गानें स्वारी काढली.

यशवंतराव दरकुच दरमजल करीत खानदेशांत भोंडगांवापर्यंत जाऊन दाखल झाले. इतक्यांत सेनापतींच्या स्वारीची बातमी दमाजी गायकवाड यांस कळून भीतीनें तोही सेनापतीस भेटण्याच्या इराद्यानें भोंडगांवीं येऊन दाखल झाला.

उभयतांच्या भेटी झाल्यावर दमाजी गायकवाड यानें सेनापतीची कांहीं तरी गोड गोड थापा देऊन समजूत घातली. हा काळपर्यंत या निष्कलंक घराण्यास कपटाचा कलंक मुळींच माहीत नसल्यामुळें दमाजीच्या बोलण्यावर सेनापतीचा बेभरंवसा मुळींच झाला नाहीं. दमाजीनें थकलेल्या सर्व पैशाचा भरणा करून शिवाय नजर नजराण्यांतही बरेंच द्रव्य खर्च करून सेनापतीस माघारें परतविलें व यशवंतराव सेनापतीही दमाजी गायकवाडाचा अधिकार त्याच्याचकडे कायम ठेवून परत तळेगांवीं आले.

सेनापती दाभाडे यशवंतराव हे जात्या सरळस्वभावाचे असल्यामुळें या सर्व कृत्यांत त्यांस विशेष कांहींच वाटलें नाहीं. उलट सर्व गोष्टी होत्या तशाच कायम राहिल्या या गोष्टींचा त्यांस आनंदच झाला. पण दमाजी गायकवाडाच्या मनाची स्थिति तशी राहिली नाहीं. दाभाडे आपल्यावर चाल करून आले व त्यांच्या मनांत आपल्या जाग्यावर कोणी तरी दुसरा मनुष्य नेमावा असें आलें, हा कल्पना त्याच्या अंतःकरणास झोंबून राहिला आणि यांचें पुढें आपण दिवस कसे काढावे या विचारांतच तो निमग्न झाला.

इकडे दाभाड्यांच्या घराण्याचा ऱ्हास होण्यास जीं बाह्य कारणें उपस्थित झालीं होतीं तशींच त्यांच्या घराण्याची वाताहात होण्यास अंतस्थकारणेंही

दुर्दैवानें गोळा झालेली होती, त्यांत एक कारण तर इतकें नाजूक होतें कीं, त्यांस पाहिजे त्यानें धक्का लाविला असतांही या घराण्याच्या सर्वांगांत शिळकाच होऊन रहाण्यात !

आमच्या या भरतखंडास अशीच एक संवय लागून गेलेली आहे कीं, याचा उदयकाळ ज्या पुरुषांच्या सुकृतीनें होईल त्याच पुरुषांच्या घर प्रकरणांत बखेडे माजून देशाचा नाश व्हावयाचा. आजपर्यंत अशा मासल्याचीं शेंकडों उदाहरणें आपल्या डोळ्यासमोर आहेत. सातारचें राजघराणें लयास जाण्याला तरी खासे मंडळींतील फुटाफूटच कारणीभूत झाली. पेशव्यांच्या घराण्यांतील नारायणराव व राघोबा दादा आणि त्यांची कुत्सा पत्नी आनंदीबाई यांची कृती लोकांच्या डोळ्यांसमोर मूर्तीमंत उभीच आहे. या ऐतिहासिक दंतकथा तरी कशाला पाहिजेत ! आज मित्तीस जीं कित्येक खानदानीचीं घराणीं मोडकळीस आलेल्या इमारती प्रमाणें अवशिष्ट राहिलेलीं आहेत, त्यांची देखील दशा या अंतस्थ स्थितीनें कशी बिघडत आहे हें ज्यांस पहावयाचें असेल त्यांनीं गायकवाड, होळकर, विंचूरकर वगैरे संस्थानिकांकडे दृष्टि फेंकावी म्हणजे वरील विधानांत कितपत तथ्यांश आहे हें त्यांच्या चटकन ध्यानांत येईल.

या विधानास अनुसरूनच आमच्या या दणदाकट दामाडे घराण्यासही एक कीड लागून त्याचा फा-

यदा या घराण्याशीं मत्सर बुद्धीनें वागणारा व केवळ निमकहरामी करणारा दमाजीराव गायकवाड यानें घेण्याची खटपट केली.

यशवंतराव दाभाडे सेनापति यांस दोन स्त्रिया होत्या. पैकीं वडील स्त्रीचें नांव अंबिका बाई होतें व हिच्याच पोटीं त्रिंबकराव नांवाचे पुत्र असून यांसच सवाई बाबूरावाचे मागें शाहु छत्रपतींनीं सेनाखासखेलीचीं वस्त्रें दिलीं होतीं. या अंबिकाबाईचें व मातोश्री उमाबाईचे दाभाडे यांचें बिलकुल बनत नसे. सुनेनें सासूचें कह्यांत राहिलें पाहिजे हा जो वृद्ध सांप्रदाय त्या सांप्रदयास अनुसरून अंबिकाबाई वागणारी स्त्री नव्हती. ह्मणून या बाईस सेनापती यशवंतराव यांनीं चांदखेड येथें एक स्वतंत्र वाडा बांधून देऊन तेथेंच ठेविली होती.

हें गृहछिद्र दमाजी गायकवाड यानें अवलोकन करून दुसरे सालीं सेनापतीकडे हिशेब देण्याकरितां ह्मणून तो जो गुजराथेंतून निघाला तो तळेगांवास सेनापतींचे हुजुरांत न येतां चांदखेडासच त्यानें मुक्काम करून अंबिकाबाईची गांठ घेतली.

यावेळीं अंबिकाबाईचे चिरंजीव त्रिंबकराव हे अगदींच बालदशेंत असल्यामुळें त्यांचें सर्वतो प्रकारें हिताहित पहाणारी ही अंबिकाबाईच होती. सबब दमाजीरावानें अंबिकाबाईशीं असें बोलणें लाविलें कीं, तुह्मी दाभाड्यांच्या सत्तेचे पूर्ण मालक असतां तुह्मां उभयतांस एकीकडे बंदीवानाप्रमाणें ठेवणें या

नोकराच्यानें बघवत नाहीं. आपण माझे धनी आहांत, करितां जर आपली मनीषा आपल्या सत्तेचा उपभोग घ्यावा अशी असेल तर मी आपल्यास गुजराथेंत घेऊन जातों व साताऱ्च्या दरबारचा लागेल तो खर्च करून यशवंतराव दाभाडे सेनापती व त्यांच्या मातोश्री उमाबाई यांनीं तळेगांवास स्वस्थ राहून गुजराथचा अंमल आपण करावा अशी तजवीज करून घेतों. पूर्वीं दाभाड्यांचें व पुण्याच्या पेशव्यांचें फाटलेलें असून महाराजांच्या शपथेंत गुंतलेला बाजीराव पेशवाही अनायासेंच नाहींसा झाला असून त्याचा पुत्र नानासाहेब पेशवा हा तूर्त अधिकारी आहे. आपल्या बापास दाभाड्यांनीं देमाय धरणी ठाय करून सोडलें होतें, याचें त्यास पक्कें स्मरण असून दाभाड्यां बद्दल तो मनांत जळफळत आहे. आणि साताऱ्च्या दरबारांत आजकाल त्याच्या इतकें वजन कोणाचेंही नाहीं. याकरितां त्याच्या मार्फतीनें हा आपला सर्व डाव साधला जाऊन माझ्यासारख्या हतभाग्य नोकरमान्याच्या कपाळीं ही धन्याची कैद पहाण्याचे दिवस रहाणार नाहींत याच हेतूनें मी ही चरणाराशीं विनंति करीत आहें. जशी या धन्यावर सेनापतींची इतराजी आहे त्याचप्रमाणें मा इमानें इतबारें नोकरी बजावीत असतांही माझ्या बद्दल सेनापतींच्या मनांत विकल्प आलेला आहे. याकरितां आपण रुकार देत असाल तर मी पुढील सर्व तर्दूद लावून देतों ! !

अगोदरच स्त्रिजात, त्यांतही सेनापतीच्या बड्या घराण्यांतील व उमाबाईसारख्या कारस्थानी सासूच्याही कह्यांत न वागणारी आणि तशांत पुत्रवति व त्यांतही तिच्या पुढें दमाजीराव गायकवाडासारख्या कपटपटूनें साखर पेरून ठेविलेली मग काय विचारावयाचें आहे? अंबिकाबाई लागलीच हुरळून जाऊन तिला दोन बोटेंच स्वर्ग उरला आणि तिनें लागलीच या शठाच्या गोड बोलण्यास मोठ्या डौलानें मान डोलविली.

आमच्या दमाजीरावास तरी तेवढेंच पाहिजे होतें. त्यानें बाईचा रुकार पडला असें पाहून लागलीच आपलीं मसलत कशी सिद्धीस न्यावयाची त्याजबद्दलचा विचार करून एक बेत ठरविला.

या मसलतींत गायकवाड यांनीं सेनापतीकडील तीन हप्ते तुंबले होते त्यांचा भरणा करण्याकरितां तळेगांवास जावें व तो भरणा झाल्यावर तसेंच पुढें पुण्यास जाऊन पेशव्यांशीं मसलत करावी आणि तसेंच परस्पर गुजराथेंत निघून जावें व इकडे अंबिकाबाईनें आपल्या चिरंजीवास बरोबर घेऊन नाशीक त्रिंबक वगैरे ठिकाणच्या यात्रा करण्याचा बहाणा करून खानदेशांत जावें आणि तेथून अनायासेंच गुजराथ जवळ करावी असें ठरलें.

ही मसलत अंबिकाबाईसही मान्य झाली. आणि तिनें लागलीच आपल्या मुलास बरोबर घेऊन यात्रेच्या मिषानें आपला मुक्काम हलविला.

इकडे दमाजीराव गायकवाड हे चांदखेडाहून निघून थेट तळेगांवीं आले. तळेगांवीं आल्यावर त्यांनीं गोड गोड शब्दांनीं बोलून व आणाभाका वाहून सेनापतींची समजूत केली व त्यांस निष्कपट भाव दाखवून आपल्यास बडोद्यास पुन्हा कायम करून घेतलें. आणि त्यांचा व उमाबाई दाभाडे यांचा शेवटला निरोप घेऊन स्वारी पुण्यास दाखल झाली.

दमाजीराव पुण्यास आल्यावर पेशव्यांचें व त्यांचें बारीक बोलणें सुरू झालें. पेशव्याच्या मनांत प्रथमपासूनच दाभाड्यांबद्दल डाव होता आणि त्यांत दाभाड्यांचा विश्वासू नोकर जेव्हां आपण होऊन आपल्या धन्यावर घाव घालण्याच्या मसलतीनें आपले बगलेंत शिरला तेव्हां तर त्याच्या आनंदास पारावार नाहींसा झाला. यावेळीं साताऱ्यास शाहुरूपी खांब निव्वळ सुवर्णासारख्या शुद्ध धातूचाच असल्यामुळें या मुंग्यांची डाळ न शिजून दाभाड्यांच्या इमारतीस कींड न लागतां ती बसली नाहीं. कदाचित याच प्रसंगास जर साताऱ्यास शाहू महाराजांशिवाय अन्यपुरूष गादीवर असता तर ही आमची इमारत कधींच कोसळून जमीन दोस्त झाली असती ! असो.

गायकवाड व पेशवे यांची गुप्त मसलत ठरून असा विचार झाला कीं, 'पेशव्यानें महाराजांस खालीं लिहिल्या प्रमाणें मजकूर समजावावा:—

" दाभाडे सेनापति यांचा खर्च अतिशय अवा- ढव्य असल्यामुळें त्यांचे कडून खजिन्याचा भरणा वेळेवर होत नाहीं. याज करितां यशवंतराव सेनापतीचे चिरंजीव त्रिंबकराव दाभाडे सेनाखासखेल यांचे हातून मुख्याचें काम घेत गेलें असतां ऐवजाचा भरणा वेळच्यावेळीं होऊन सरकारास आडचण मुळींच पडावयाची नाहीं. त्रिंबकराव दाभाडे हे हल्लीं वयानें जरी लहान आहेत, तथापि दाभाड्यांच्या पदरीं दमाजी गायकवाड मोठा मुत्सद्दी व विश्वासू मनुष्य असल्यामुळें तो तें सर्व काम पार पाडील. आजपर्यंत त्यानें गुजराथेचा बंदोबस्त फारच चांगला ठेविला आहे. पण आलीकडे सेनापती दाभाडे व त्यांच्या मातोश्री उमाबाई दाभाडे यांच्या मनांत दमाजी बद्दल किंतू आल्यामुळें त्यांचा बेत गुजराथेंत दुसरा सुभा पाठवून तिकडील बंदोबस्त करावा असा दिसतो. त्यास दमाजीनें ह्मणूनच गुजराथेचा योग्य बंदोबस्त राखून वसूल वासलातीचें काम सुरळीत करून ठेविलें आहे. पण सेनापतीच्या मनाप्रमाणें जर गुजराथेंत दुसरा कोणी सुभा गेला तर वसूल वासलातीची अडचण पडेल एवढेंच नव्हे तर सर्व गुजराथ मराठ्यांच्या ताब्यांत राहील कीं नाहीं ही देखील शंकाच आहे. करितां इतक्या थरास गोष्ट येऊं देण्यापेक्षां अंबिकाबाई दाभाडे व त्याचे चीरंजीव त्रिंबकराव दाभाडे सेनाखासखेल त्यांचे हातून कारभार घ्यावा हें बरें दिसतें. "

याप्रमाणें उभयतांची मसलत ठरून पेशव्यास जर कांहीं दरबार खर्च लागला तर आपण देऊं असा करार करून दमाजी गायकवाड पुण्याहून उठाले. ते अंबिकाबाईशीं मसलत केल्याप्रमाणें त्यांनीं थेट गुजराथेचा रस्ता सुधारला.

इकडे पूर्वीं ठरल्या प्रमाणें अंबिकाबाई दाभाडे या आपल्या पुत्रासह गंगेच्या निमित्यानें ज्या निघाल्या त्या नाशिक त्रिंबक करून तशाच खानदेशांत शिरल्या. खानदेशांत जेथ जेथें दाभाड्यांचीं ठाणीं होतीं तेथें तेथें प्रवेश करून तिकडील मामलेदारास धरून त्यांजपासून पैसा वसूल करूं लागल्या; आणि त्या पैशांत फौज ठेवण्याचा सपाटा त्यांनीं सुरू केला.

त्याचप्रमाणें इकडे पेशव्यांनींही गायकवाडाशीं मसलत केल्याप्रमाणें श्रीमंत शाहूमहाराजांकडे सेनापतीच्या संबंधानें बोलणें काढलें, परंतु शाहुमहाराजांस दाभाड्याचे घराणें पहिल्यापासून पुरें माहीत असल्यामुळें त्यांनीं पेशव्यांच्या बोलण्यास यत्किंचितही मान दिला नाहीं, एवढेंच नव्हे तर उलट पेशव्यास साफ सांगितलें कीं, आह्मास उमाबाई दाभाडे व येशवंतराव दाभाडे सेनापति यांचें अगत्य विशेष आहे. त्यांचें जेणें करून बरें होईल तेंच आह्मास कर्तव्य आहे, त्यांच्या घराण्यांतील अंबिकाबाई ही जर फटकून रहात असेल तर तो सर्व मामला घरगुती आहे व घरगुती मामल्याचा बंदोबस्त ते आपल्या मनाप्रमाणें

पाहिजे तसा करतील. त्यांत बोलण्याचा अधिकार कोणासही पोंचत नाहीं. हें महाराजांचें खर्पूस उत्तर ऐकल्या बरोबर पेशव्यांचे हातपाय अर्थांतच जागच्या जागींच थंड झालें.

हे दोन प्रकार दोहींकडे चालू झाल्या बरोबर आपल्या घरांत फितूर झाला ही बातमी येशवंतराव व उमाबाई यांस कळली. ती कळतांच आतां उपेक्षां करून उपयोग नाहीं असें मनांत आणून तीं उभयतांही महाराजांच्या भेटीकरिता साताऱ्यास निघून आलीं. साताऱ्यास आल्यावर त्यांनीं अंबिकाबाई व दमाजी गायकवाड यांच्या संबंधाची सर्व हकीकत महाराजांच्या कानावर घातली, तेव्हां महाराजांस वाईट वाटून त्यांनीं लागलीच या गोष्टीचा बंदोबस्त करण्याचा निश्चय केला.

खरोखरी पाहिलें तर शाहुमहाराजासारख्या छत्रपति राजास दामाडयांच्या घरगुती प्रकरणांत मन घालून व्यवस्था लावण्याचें किंचित्‌ही कारण नव्हतें. पण ते तेव्हांच सजतीय राजे अशाच उदार मनाचे असत कीं, त्यांनीं एकवेळ ज्या मनुष्याला किंवा घराण्यास आपलें ह्मटलें त्यास ते कधींही दूर ढकलावयाचें नाहींत. शाहुमहाराजांनीं तरी याच तत्वास अनुसरून दामाड्यांच्या घरचा बंदोबस्त लावण्याचा बेत त्यांनीं केला.

प्रथमारंभीं अंबिकाबाईस एक खरपूस पत्र लिहिलें. त्या पत्रांतील गोषवारा देण्यापेक्षां तें अ-

स्सल पत्रच आह्मी येथें देतों. तें पत्र येणें प्रमाणें:——

" सौभाग्यवति अंबिकाबाई दाभाडे यांस आज्ञा केली ऐशीजे, सेनापति व सेनाखासखेल या दोन्ही मामलयाचा अखत्यार स्वामींनीं गंगाजळ निर्मळ उमाबाई दाभाडे यांजवर दिला आहे. आजतागाईत त्यांच्या वजनदारीवर कित्येक प्रकारें स्वामींनीं बरदास्त करून आजपर्यंत चालविलें. पुढें चालविल्यास भीड त्यांचीच तुह्मी सर्वांनीं त्यांच्या आज्ञेंत चालावें, ती गोष्ट न करितां आपल्या स्वच्छंदें वर्तणूक करूं लागळां, फौज ठेवून मुलकांत जाऊन धामधूम केलीत, तिकडे जाऊन राहिलां आहां, याचा विचार काय ? स्वामींचा सरकारचे तिसाला मामळतीचा ऐवज येणें त्याचा निकाल नाहीं. दुसरें कर्जाची पट्टी सर्वांवर घातली आहे, त्याप्रमाणें गंगाजल निर्मळ उमाबाई दाभाडे यांजवर पट्टी बसली आहे. त्याचा निकाल नाहीं. सारा बखेडा तुह्मी मांडला आहे, ही गोष्ट बरी नाहीं. आपले स्वसत्तेनें मनमानेल तैशा वर्तणुका कराव्या ही रीत स्वामीस मानती ऐसें नाहीं- यास्तव कित्येक आज्ञा करणें ती करून राणोजी साळोंखी हवालदार व हुजरे पाठविले आहेत. हे सांगतील तीं स्वामींचीं वचनें जाणोन पत्रदर्शनीं राजश्री त्रिंबकराव दाभाडे सेनाखासखेल यांस घेऊन, राजश्री सेनापतींचे दर्शनास येणें. येविशीं उजूर केलियानें उत्तम नाहीं.

राजश्री सेनापति यांजवळ तुह्मी रहावें. रीतिप्रमाणें चालावें. यांतच लौकिक आहे. आणि रीती करून न वागल्यास शेवट कळतच आहे. इतके दिवस स्वामींनीं तमाशा पाहिला. या उपरी स्वामींस उपेक्षा कारितां येत नाहीं. ऐसें स्पष्ट समजून कोणेविशीं उजूर न करतां येणें. राणोजी सांळोंखी व हुजरे पाठविले आहेत. यांस मसाला देविला आहे त्याप्रमाणें देणें."

येणेंप्रमाणें महाराजांचें पत्र चिटणीसाकडून लिहिलेलें असून त्यावर खुद्द छत्रपति शाहु महाराजांच्याही कांहीं ओळी आहेत त्या येणेंप्रमाणें:—

"घेऊन येणें. पत्रदर्शनीं दर्शनास येण्यास उजूर केल्यास उत्तम नाहीं. अगत्य अगत्य घेऊन येणें. बहुत काय लिहिणें."

येणेंप्रमाणें शाहु महाराजांचें पत्र अंबिकाबाई दभाडे यांस रवाना झालें. पत्र घेऊन माणसें खानदेशांत पोंचल्यावर त्यांनीं महाराजांचे आज्ञापत्र अंबिकाबाईस दिलें आणि गायकवाडाच्या मसलतीस लागून तुह्मी जो बखेडा मांडला आहे तो महाराजांस पसंत नसून आजपर्यंत केवळ दाभाड्यांच्या पुरुषावर नजर देऊन तुमच्या वर्तणुकीकडे त्यांनीं चित्त दिलें नाहीं, पण यापुढें जर तुह्मी बखेडे कराल व सेनापतींच्या व महाराजांच्या दर्शनास न याल तर खचित परिणाम गोड होणार नाहीं असा तोंड जबानीही मजकूर सांगितला.

राजाच्यासत्तेचा जोर कांहीं वेगळाच असतो. हल्लीं देखील आपण हमेषा असें पहातों कीं, एकाद्या ठिकाणीं हजार पांचशें मनुष्यांचा जर दंगा चाललेला असला व तेथें एकादा यःकश्चित पोलिसचा पट्टेवाला येऊन पोंचला तर हजार पांचशें मनुष्यांची देखील गाळण होऊन ते लोक त्या एकल्या काळ्या डगलेवाल्यास यमस्वरूपी समजून चार चोहींकडे वितळून जातात! मग जेथें खुद्द राजाची आज्ञा असेल आणि तीही आग्रहाची व तशांतही ती शाहु महाराजांसारख्या अवतारी राजाची, तेथें तिचा भंग करण्याची कोणाची प्राज्ञा होणार? अंबिकाबाईनें ही खरपूस आज्ञा ऐकली मात्र तोंच तिच्या पूर्वींच्या मसलतीचें मागच्या जागींच पाणी होऊन व गायकवाडाच्या मसलतीनें आपला सर्वस्वी घात होईल आणि शाहु महाराजांच्या दरबारांत पेशव्यांची देखील डाळ शिजावयाची नाहीं, अशी तिची पक्की खात्री होऊन ती लागलीच राजाज्ञेप्रमाणें राजसेवकां बरोबर साताऱ्यास येण्यास पुत्रासह निघाली आणि तिनें पूर्वीं जी नवी फौज वगैरे ठेविली होती, त्या सर्वांस महाराजांच्या आज्ञेप्रमाणें एकदम निरोप दिला.

अंबिकाबाई खानदेशांतून निघून एकदम साताऱ्यास येऊन दाखल झाली व तिणें शाहू महाराजांचें दर्शन घेतलें. बाई दर्शनास आल्यावर महाराजांनीं तिला सांगितलें कीं, "तुझी सेनापतीचे व उ-

मावाईचे आज्ञेंत चालावें. तेही तुह्मावर लोभच करतील." अशा प्रकारें अंबिकाबाईची समजून घालून तिची तळेगांवास रवानगी केली. अंबिकाबाईनेंही पुढें खावडाव न करतां महाराजांच्या आज्ञेप्रमाणें ती तळेगांवास आपल्या सासू व पतीजवळ सुखानें राहिली.

याप्रमाणें दाभाड्यांच्या घरावर आलेल्या दोन्हीही किटाळांचें यावेळीं शाहु महाराजांनीं निवारण केलें, व त्यामुळें या घराण्याचा तेव्हांच जो फडशा पडावयाचा तो न पडतां त्याचे आयुष्याची थोडीशी वृद्धि झाली. पण ही स्थिति फार दिवस टिकली नाहीं, कारण आपळपोटे इमानी नोकर गायकवाड आणि परोत्कर्ष सहन न करणारे पेशवे हे दोघेही ग्रह बाराव्या राशीला येण्यास व्याघ्रासारखे टपलेले असून या पापग्रहांस जबाब देणारा जो घरचा स्वामि शाहू तो फारच थोड्या अवकाशांत चलन पावल्यामुळें आमच्या या घराण्यावर वरील दोवां पापग्रहांची झडप पडून या पृथ्वीतलावर सूर्याप्रमाणें झळकणाऱ्या त्यांनीं दैदिप्यमान दाभाड्यांच्या घराण्याचा अखेर सर्वस्वी "ग्रास" केला!!

असो. तो सर्व प्रकार याच्या पुढील भागांत वाचकांस आढळणार आहे.

# भाग नववा.

(ऱ्हासकाल—निव्वळ बेमानपणाच !)

मागील भागांत दाभाडयांचें घराणें केवळ शाहु-छत्रपति महाराजांच्या कृपेनें वांचलें गेलें हें सांगितलेंच आहे. शाहुमहाराजांनीं जर या वेळीं नेट धरलें नसतें तर पेशव्यांच्या मदतीनें गायकवाडांनीं दाभाड्यांस कधींच पालथे घालून आपण गुजराथेचे मालक झाले असते. परंतु या घराण्याची पूर्वपुण्याई या वेळीं शिलक असल्यामुळें कोणाचाच काबू न चालता सर्व स्थिरस्थावर झालें.

परंतु ही स्थिरता फार दिवस मुळींच कायम राहिली नाहीं. कारण या घराण्याचे कैवारी व या एकट्या घराण्याचेचसे काय, पण सर्व हिंदु लोकांचे मूळ आधारस्तंभ व गोब्राह्मणांचे प्रतिपालक श्रीछत्रपति शाहुमहाराज यांस शके १६७१ (सन १७४९) मार्गशीर्ष वद्य २ च्या दिवशीं देवाज्ञा झाली ! हा अवतारी हिंदुराजा नाहींसा झाल्याबरोबर हिंदुपद राज्याची समाप्तीच झाली ह्मणावयाची; आणि अर्थात तशी समाप्ति झाल्यामुळें त्या राज्यवृक्षाच्या शाखा जीं दाभाड्यांसारखीं एकनिष्ट घराणीं त्यांचाही लय होऊन चोरालुच्यांस अर्थातच लुबाडण्यास संधि सांपडली ! ! असो.

शाहुमहाराज वारल्यावर सातारच्या गादीवर ताराबाईसाहेबांचे नातु रामराजे हे बसले. त्यांस ज्या वेळीं राज्याभिषेक झाला त्या वेळीं ठरावाप्रमाणें सर्व मानकरी लोकांस व प्रधानमंडळीस वस्त्रें मिळालीं. त्यांत सेनापतीचीं वस्त्रें यशवंतराव दाभाडे यांस मिळून खासखेलीचीं वस्त्रें त्रिंबकराव दाभाडे यांस मिळालीं. त्या नंतर सातारचा राज्यकारभार कांहीं दिवस सरळ चाललेला होता. पण थोड्या वर्षांनीं ताराबाईसाहेब व रामराजे यांच्यांत वांकडेपणा उद्भवून ताराबाईनें रामराजास अटकेंत ठेविलें.

ईश्वराच्या घरचा नियमानियम पहा कसा मजेचा आहे तो. त्याच्या मनांत जोंपर्यंत आमच्या या आर्यजननीवर कृपा करावयाची होती तोंपर्यंत अशींच माणसें उपजत होतीं कीं, त्यांचा कलह म्हणून व्हावयाचाच नाहीं. तोच ईश्वराचा कृपाकटाक्ष उलट झाल्याबरोबर सख्खी आजी व सख्खा नातू यांच्यांत देखील कलह माजून एकमेकांचे एकमेक शत्रु बनण्याची पाळी आली!

या त्यांच्या कलहामुळें आजू बाजूच्या लोकांस त्यांच्या कारभारांत हात घालण्याची संधि सांपडून या सोन्यासारख्या राजघराण्याचा ऱ्हास होत गेला. ताराबाईनें रामराजास थोडे दिवस अटकेंत ठेविलें न ठेविलें तोंच सर्व राज्यांत बखेडा उत्पन्न होऊन अखेरीस खुद्द ताराबाईस पेश

त्यांनीं अटकेंत ठेविलें. इकडे रामराजेही हीं अटकेंत होते तसेच होते. मात्र या लटपटींत पेशव्यांचें वजन अतीशय वाढून ते कर्तुमकर्तुं असे झाले. सर्व हिंदुस्थानभर त्यांचा दरारा बसला एवढेंच नव्हे, पण ते मराठी राज्याचे अधिपतीच बनून राहिले असें ह्मणण्यासही प्रत्यवाय नाहीं.

मुळापासून दाभाडे आणि पेशवे यांचें वैमनस्य होतेंच तशांत जेव्हां पेशव्यांची शक्ति आटोकाट झाली व दाभाड्यांचा सुभा गायकवाड हाही आपल्या मालकाच्या डोकीवरून हात फिरविण्यास तिलांजली घेऊन उभा होता, तेव्हां अर्थातच पेशव्यांनीं दमाजी गायकवाडास बगलेंत मारून त्याच्या जवळून निम्मे गुजराथेचे कागद पत्र आपल्या नांवचे करून देण्याचा करार करून घेतला. व त्याला पुरा फितवून उभयतांनीं मिळून दाभाड्यांस रसातळास पोंचविण्याची मसलत योजली.

इतर सर्व बार भरला गेल्यावर पेशव्यांनीं दाभाड्यांशीं निम्मे गुजराथचें बोलणें सुरू केलें. दाभाड्यांस आपल्या पदरचा विश्वासू नोकर गायकवाड पेशव्यास फितला असेल हें स्वप्नांतही माहीत नव्हतें. त्यामुळें पेशव्यांनीं निम्मे गुजराथचें बोलणें लाविल्या बरोबर यशवंतराव दाभाडे यांनीं दमाजीरावास या मागणीचा विचार कसा करावयाचा ह्मणून विचारलें. गायकवाडांचें व पेशव्यांचें पूर्वींच ठरलें होतें त्याप्रमाणें, गायकवाड यांनीं आ-

पल्या धन्याची कळकळ दाखवून साफ उत्तर दिलें कीं, गुजराथेचा व पेशव्यांचा संबंध काय व ते ती मागतात काय ह्मणून ? आपल्यास गुजराथेंतील काडीही पेशव्यांस द्यावयाची नाहीं. मग याबद्दल लढाई झाली तरी फिकीर नाहीं.

हे दिसण्यांत अमृतासारखे, पण आंत विषानें भरलेले बोल भोळ्या यशवंतरावास खरे वाटून त्यांनीं लागलीच पेशव्यास खडखडीतपणाचा निरोप पाठविला. पेशवे व गायकवाड यांचा बार भरलेला च होता त्यामुळें पेशव्यांनीं लागलीच तळेगांवावर चाल केली. ही गोष्ट सन १७५१ त घडली.

या कलियुगांतील धर्मयुद्ध ह्मटलें तरी लढाईची सूचना एकमेकांनीं एकमेकांस द्यावी असें आहे, पण पेशव्यांनीं दाभाड्यांस तशी सूचना मुळींच न करतां निव्वळ दरवडे खोरांच्या डाक्याप्रमाणें अकस्मात जाऊन दाभाड्यांवर हल्ला केला. तथापि शूर पुरुषांची बलाय नेहमीं दूरच असते, ते पुरुष प्रसंगीं कधींही मागें घेत नाहींत. त्या प्रमाणें यशवंतराव दाभाडे यांनींही माघार न घेतां पेशव्यांशीं खशाले तोंड दिलें. पण पेशव्यांनीं पूर्वीच फौजेंत फंद फितूर करून ठेवला असल्यामुळें दाभाड्यांचा अखेर पराभवच झाला.

या लढाईंत दमाजीराव गायकवाड आपल्या पुत्रासहवर्तमान होता. पण त्याचा पहिल्यापासूनच पेशव्याशीं बेत ठरला असल्यामुळें तो तरी आपल्या

धन्यास यश प्राप्ती होण्याची इच्छा कशी करील ? असो. इच्छेनुसार दाभाड्यांचा मोड होऊन यशवंतराव दाभाडे सेनापति धरले गेले. त्यांत दमाजीराव गायकवाडही पुत्रासह पकडला गेला. यशवंतरावांचे चिरंजीव त्रिंबकराव दाभाडे हे व त्यांच्या मातोश्री उमाबाई याही कैद झाल्या. पेशव्यांनीं ही सर्व मंडळी पुण्यांत आणून ठेविली. आणि दाभाडे सेनापति यांची सर्व दौलत लुटून फस्त केली.

गायकवाड हे जरी पेशव्यांचे कैदेंत होते तथापि त्यांच्या एका तनसडीस देखील पेशव्यांनीं धक्का लाविला नाहीं, यावरून गायकवाड पेशव्यास फितूर झाले होते हें उघड सिद्ध होतें ! निमकहरामीचा दोष बाह्यता तरी आपल्यावर येऊं नये ह्मणून दमाजीरावांनीं केवळ दाभाड्यांच्या तर्फे लढण्याचा व पेशव्यांच्या कैदेंत बसण्याचा बाहाणा मात्र केला असें उघड दिसतें ! ! याच सालीं आणखी एक चमत्कारिक गोष्ट घडून आली. मोंगल लोकांनीं फ्रेंच लोकांच्या साह्यानें पुण्यावर स्वारी केली. ही स्वारी येतां येतां त्यांस तळेगांव लागलें. या वेळीं दाभाडे मुळींच कैदेंत असल्यामुळें त्यांस अडथळा ह्मणून झालाच नाहीं. मोंगलांनींही दाभाड्याची राहिलेली दौलत समूळ लुटून नेली. पुढें पेशव्यांची व मोंगलांची लढाई होऊन त्यांत मोंगलांचा पराभव झाला. पण दाभाड्यांची दौलत लुटली ती गेलीच गेली ! असो.

इकडे थोड्याच दिवसांनीं गायकवाड यांनीं दाभाडे सेनापति यांची कळकळ दाखवून पेशव्यांशीं तहाचें बोलणें लाविलें. त्यांत पूर्वींच आपसांत ठराव झाल्याप्रमाणें गुजराथेंतील १४ महाल पेशव्यांनीं घ्यावे आणि बाकीच्या गुजराथेवर सेनापतींच्या तर्फेनें दमाजीराव गायकवाड यांनीं रहावें आणि खुद्द सेनापतींनीं सातार्‍यास हुजूर रहावें असा ठराव केला. पूर्व संकल्पाप्रमाणें पेशव्यांनींही हा ठराव मान्य करून कैद केलेली सर्व मंडळी खुली करून दिली.

यशवंतराव दाभाडे खुले होऊन तळेगांवास आल्यावर त्यांच्या मनांत गायकवाडाबद्दल पुरा संशय येऊन त्यांनीं गुजराथेंत आपल्या तर्फे ताप- कीर किंवा दुसरा कोणी तरी सुभा पाठविण्याचा विचार केला. पण दमाजीराव गायकवाड हा सावध असल्यामुळें त्यास ही कुणकुण लागतांच तो एकदम उठून तळेगांवास गेला. या वेळीं पेशव्यांची स्वारी आळंदीचे मुक्कामीं होती. आपल्यास पेश- व्यास नेऊन भेटवितों व त्यांच्याशीं जो आपण नुकताच तह केला आहे त्याचा अंमल त्यांच्याकडून करून घेतों असें दमाजीरावानें उमाबाई व यशवंत- राव दाभाडे यांस सांगितलें. या उभयतांचाही दमाजीवर त्याच्या पूर्व कृतीवरून विश्वास बसेना, हें पाहून दमाजीनें आपल्या पोटांत कपट नाहीं याची खात्री करून दाखविण्याकरितां उमाबाईस आपल्या हातानें बेलभंडार उचलून दिला.

उमाबाई व यशवंतराव दाभाडे यांस दमाजीची ही सर्व कृति मरंवशा लायक वाटून त्यांनीं त्याच्या बरोबर पेशव्याच्या भेटीस जाण्याचें कबूल केलें.

पेशवे जवळच आळंदी मुक्कामीं असल्यामुळें उमाबाई व यशवंतराव आपली बरीच फौज बरोबर घेऊन पेशव्यांचे भेटीस आले. भेटीस आल्याबरोबर आरंभींच पेशव्यांनीं दाभाड्यांच्या फौजेस वेढा दिला आणि गायकवाडांनीं आपल्या यजमानास फाशांत अडकाविण्याची पूर्वींच योजना करून ठेविली असल्यामुळें, दाभाड्यांची फौज वेढ्यांतून मुक्तत्यानें बाहेर पडली आणि अर्थात यशवंतराव आणि उमाबाई दाभाडे पेशव्यांच्या कैदेंत पुनः सांपडलीं !

शिव शिव ! केवढें अघोर पातक हें ? स्वतः आपल्या अन्नदात्याशीं त्यास पूर्वीं पूर्ण आश्वासन देऊन व त्यानें विश्वासानें आपल्या मांडीवर मान ठेविली असें पाहून हरामखोरी करावी आणि त्याला त्याच शत्रूच्या स्वाधीन करून आपण त्याच्या दौलतीचा अपहार करावा, यासारखें अघटित पातक आणखी तें काय असावयाचें ? असलीं बेमान माणसें या देशांत उत्पन्न झाल्यामुळेंच कीं काय कोण जाणें? आज या देशांतील सर्व लोकांवर ईश्वरानें दुर्धर प्रसंग आणला आहे ! आणि खरेंच असा बेमानपणा ज्या देशांत होईल त्या देशावर आमच्या देशाप्रमाणें कितीही बिकट प्रसंग आले तरी त्यांत ईश्वराकडे मुळींच बोल येत नाहीं. कारण आ-

मच्या पातकाचें आह्मास योग्य बक्षीस मिळत आहे असें उघड दिसतें !

अहाहा ! या बेमानपणाचा या कलियुगांत केवढा तरी पराक्रम आहे ? जो यशवंतराव दाभाडा डभोईच्या लढाईंत बाजीराव पेशव्यासारख्यास काळसा भासला व ज्यानें बाजीराबास दे माय धरणी ठाय करून साताऱ्च्या दरबारांत दातीं तृण धरावयास लाविलें. तोच येशवंतराव दाभाडा आणि त्याची मातोश्री जी एक वेळ इतिहासांत गाजली जाऊन तिनें अमदाबादच्या स्वारींत तेथील नबाबाची हाडीनहाडी मोकळी केली, ती उमाबाई दाभाडी आपल्या पदरच्या नोकराच्या प्रभावानें एका मिनिषांत गडबड न करतां शत्रूच्या हातीं सांपडली हा काय बेमानपणाचा लहान पराक्रम समजावयाचा ? खरेंच या सपाऱ्यापुढें साक्षांत महा पराक्रमी शिवपुत्र वीरभद्र जरी असला, तथापि तो हतवीर्य होऊन शत्रुमुखीं पडेल यांत संदेह नाहीं ! असो.

या अघोर पातकाची खूण अद्यापही गायकवाड घराण्यांत दिसत आहे. ती हीच कीं दमाजीरावानें आपल्या उजव्या हातानें आपल्या धन्यास बेलभंडार उचलून देऊन त्याच्याशीं दगेखोरी केली, याकरितां गायकवाड अद्यापपर्यंत कोणास रामराम करावयाचा तो डाव्या हातानें करतात असें ऐकिवांत आहे !

याप्रमाणें यशवंतराव दाभाडे सेनापति व त्यांच्या मातोश्री उमाबाई उभयतांही कैदेंत असतांच उमाबाईचा काळ झाला! अहाहा! उमाबाई ह्मणजे साक्षात शत्रुसंहारिणी शिवशक्तिच असतां तिचा काळ शत्रुच्या कैदेंत व्हावा ही विधात्याच्या घरची अघटित घटनाच ह्मणावयाची! याला दुसरें समाधानच नाहीं. अस्तु.

उमाबाई निवर्तल्यावर यशवंतराव दाभाडे यांनीं खटपट करून आपली मुक्तता करून घेतली. कैदेंतून मुक्त झाल्यावर ते तळेगांवास न जातां आंभोण्यास गेले. तेथें जाऊन आपल्या नशिबाची परीक्षा एकवार करून पहावी या हेतूनें त्यांनीं फौज जमा करण्याचा प्रयत्न सुरू केला.

ही बातमी पेशव्यास समजतांच त्यांनीं एक आपला वकील दाभाडयांशीं बोलण्याकरितां आंभोणें मुक्कामीं पाठविला. त्यानें येऊन यशवंतराव दाभाडे सेनापति यांशीं बोलणें लाविलें कीं, गायकवाड तुमचे पदरीं आहेत, ते तुमची चाकरी यापुढें पूर्ववत करतील. तूर्त आपण त्यांस दूर करण्याचें मनांत आणूं नये. तसेंच आपण राजाराम महाराज यांस अनुकूल न होतां आमच्या मतानें चालावें. गायकवाडाकडून तुह्मास दरमहा खर्चाकरितां १०,००० रुपये मिळत जातील. खानदेश व बागलाणकडील जे मोकाशे आहेत ते सर्व तुमचेकडे पूर्ववत चालवूं. व

हल्लीं तुह्मास जें कर्ज झालें आहे त्याचाही फडशा गायकवाडाकडून करून देऊं.

असें पेशव्यांचें बोलणें पडल्यावरून यशवंतराव यांनीं विचार केला कीं, ज्या अर्थीं आपले धनी रामराजे पेशव्यांच्या कैदेंत आहेत त्या अर्थीं या वेळीं आपण यांच्याशीं घासाघीस घालणें बरें नाहीं. असा विचार करून ते लागलीच पेशव्यांच्या भेटीं-करितां पुण्यास निघून आले. पुण्यास आल्यावर पेशव्यांनीं सेनापतीकडून दमाजी गायकवाड यांस गुजराथेच्या सुभ्याचीं वस्त्रें देववून त्यास गुजराथेंत रवाना केलें,तथापि सेनापतींचें मन गायकवाडाविषयीं शुद्ध होतें असा अर्थ नाहीं

पुढें दाभाडे हुजूर राहिल्यास पुनः बखेडे करतील असें पेशव्यांच्या मनांत येऊन बाळाजी बाजीराव पेशवे यांस कर्नाटकची स्वारी करावयाची होती स-बब त्यांनीं त्या स्वारींत यशवंतराव दाभाडे यांसही बरोबर घेतलें. यशवंतराव या स्वारींत गेले असतां कृष्णातीरीं त्याचा वाखा झाला. पेशव्यांनी त्यांच्या आरोग्याकरितां वैद्य वगैरे देऊन बरीच धांवाधांव केली, पण अखेरीस यश न येतां यशवंतराव दाभाडे सेनापति यांचा तेथेंच अंत झाला !

यशवंतराव दाभाडे पडल्यावर त्यांचे पुत्र त्रिंबक-राव दाभाडे यांस पेशव्यांनीं साताऱ्यास नेऊन रामराजे यांजकडून सेनापतीचीं व सेनाखास-खेलीचीं वस्त्रें देवविलीं. ही वेळ ह्मणजे अशाच

मासल्याची होती कीं, साताराच्या गादीवरील पुरुषानें पेशवे सांगतील त्यांस वस्त्रें द्यावीं व वस्त्रें घेणारांनींही तीं उगीच वापरावीं ! यापेक्षां त्या वस्त्रें देण्याघेण्यांत अर्थ ह्मणून मुळींच नव्हता. त्याप्रमाणेंच त्रिंबकराव दाभाडे यांस सेनापतीचीं वस्त्रें जरी मिळालीं तथापि त्यांस पेशव्यांचा पदर धरून नेहमीं रहावें लागत असे.

याच सुमारास ह्मणजे सन १७६१ त पेशव्यांच्या घराण्यांत व एकट्या पेशव्याच्याचशा काय, पण सर्व दक्षिण हिंदुस्थानांत मोठा कहर गुदरला. तो कहर कशाचा हें आमचे चाणक्ष वाचकें अदमासानें देखील जाणतीलच. तथापि आपल्या एकंदर कथेच्या जुळणी करितां आह्मीही त्याचा उल्लेख थोडासा येथें करितों. हा कहर ह्मणजे सोनपत पानपतची लढाई होय. या लढाईत मराठ्यांचा इतका ठेचा उडाला कीं, दक्षिणेंत रडलें नाहीं असें एकही घर राहिलें नव्हतें ! याच दंगलांत पेशव्यांचे दोन खासे पडले. एक सदाशीवरावभाऊ व दुसरे विश्वासराव. हे दोघेही वीर पुरुष लढाईंत पडल्यामुळें बाळाजी बाजीराव यांस बहूत वाईट वाटून तो स्वतः स्वारी करण्यास निघाला व त्या वेळीं त्यानें त्रिंबकराव दाभाडे सेनापति यांसही त्यांच्या फौजेसुद्धां आपले बरोबर घेतलें.

बाळाजी बाजीराव ऊर्फ नानासाहेब पेशवे हे स्वारी करून निघाले खरे, पण त्यांस वाटेंतच शत्रू

फार लांब गेला असें कळल्यावरून ते भेलशापासू-
नच परत फिरले. ते पुण्यास येऊन पोंचल्यावर त्यांचे
प्रकृतीस विकार होऊन ते लागलीच मरण पावले.

नानासाहेब पेशवे मरण पावल्यावर त्यांचे वडील
चिरंजीव माधवराव बल्लाळ यांस साताऱ्यास नेऊन
पेशवाईचीं वस्त्रें देवविलीं. यावेळीं माधवराव यांचें
वय फारच लहान होतें सबब राज्याचा कारभार
त्यांचे चुलते राघोबादादा हे पहात असत. परंतु
थोड्याच दिवसांत राघोबादादा व माधवराव यांच्या-
मध्यें वांकडेपणा येऊन प्रथम राघोबादादा यांनीं
माधवराव यांस अटकेंत ठेविलें.

पेशव्यांच्या घराण्यांत अशा प्रकारें दुही झालेली
पाहून त्रिंबकराव दाभाडे सेनापति यांनीं ही संधी
बरी आहे असें समजून स्वतंत्र रीतीनें फौज ठेवण्या-
स आरंभ केला. ही बातमी राघोबादादास
समजतांच त्यांनीं दाभाड्यांस पुनः आळंदीस बोला-
विलें, आणि ते आळंदीस आल्यावर त्यांची निखा-
लसता करून व अन्य रीतीनेंही पुष्कळ खात्री
करून समजूत घातली. त्यावरून त्रिंबकराव यांनीं
नवीन ठेविलेली फौज कमी केली.

इतक्यांत आणखी असा एक प्रकार घडून आला
कीं, पेशव्यांच्या घराण्यांत दुही माजली आहे
असें पाहून साताऱ्यास रामराजे यांच्या पती-
ची जी मंडळी होती तिनें जाऊन निजामउल्मुल्क
यास ही बातमी दिली व तुझास हातपाय

हालविणें असतील तर हीच संधी उत्तम आहे असें त्यास सांगितलें. निजामउल्मुलुख तर हातांत मंत्राक्षता घेऊन तयारच होता. त्यास देवानें असा सोन्यासारखा दिवस आणल्यावर तो काय ह्मणून आळस करील? त्यानें लागलीच फौजेची तयारी करून पेशव्यावर चढाई केली.

हें वर्तमान राघोबादादास समजतांच त्यांनीही स्वारीची तयारी करून बरोबर माधवराव व दाभाडे या उभयतांसही घेतलें. राघोबादादा फौजेसुद्धां नगरापर्यंत गेले. राघोबादादांनीं गायकवाड यांस पूर्वींच निरोप पाठवून कुमकेस बोलाविलें होतें. त्याप्रमाणें दमाजीराव आपल्या फौजेसुद्धां येऊन पेशव्यास मिळालें.

खरोखरीं पाहिलें तर गायकवाड हे स्वतंत्र सरदार नसून दाभाड्यांचे नोकर होते. त्यांनीं पेशव्यांच्या बोलण्यावरून दाभाड्यांस न विचारतां लढाईस येण्याचें कारणच नव्हतें, पण ज्या दमाजी गायकवाडास आपल्या धन्यास धाब्यावर बसवून स्वतः मालक होण्याची पूर्ण इच्छा होती, तो ही स्वतंत्रपणाची संधी अर्थात कधींही दवडावयाचा नाहीं व त्याप्रमाणें पेशव्यांचें आमंत्रण पोंचल्याबरोबर दमाजीबुवा पेशव्यांच्या सेवेंत येऊन हजर झाले.

ते नुसते हजर झाले एवढेंच नव्हे तर त्यांनीं दाभाड्यांच्या संबंधानें पेशव्यांशीं बोलणेंही सुरू केलें. तें असें कीं " पेशव्यांनीं ज्याप्रमाणें छत्र-

पति रामराजे यांचा व त्यांचे राज्याचा बंदोबस्त केला आहे, त्याचप्रमाणें त्रिंबकराव दाभाडे सेनापति सेनाखासखेल यांचा व त्यांच्या मुलुखाचा आह्मी बंदोबस्त करतों. दाभाड्यांच्या जवळ हल्लीं शहाणासुर्ता कारभारी मुळींच कोणी नसल्यामुळें त्यांच्या दौलतीचा व्हावा तसा बंदोबस्त त्यांचे हातून होत नाहीं. शिवाय त्यांचे मनांत गायकवाड व पेशवे या उभयतांबद्दलही वैर आहे तरी याचा विचार आपण करावा."

गायकवाडांनीं पेशव्याशीं आपल्याविरुद्ध अशी मसलत केली याची कुणकुण सेनापतीस कळतांच त्यांनीं एक क्षणाचीही फुरसद न देतां, आपली फौज फांटा तेथल्यातेथेंच सोडून देऊन आपण एकटे सड्या स्वारीनिशीं नगराहून जे निघाले ते थेट खानदेशांत दाभाड्यांच्या पदरचाच एक जुना सरदार माधवराव बांडे ह्मणून होता त्याजकडे गेले.

पण उपयोग काय ! पळस कोठेंही गेला तरी त्यास तीनच पानें यावयाचीं. त्याप्रमाणें एकवार एकाद्याचें दुर्दैव त्याच्या पाठीस हात धुवून लागलें ह्मणजे तो सात पाताळांत गेला अगर त्यानें प्रत्यक्ष इंद्राची जरी पाठ धरली तरी तें त्यास सोडावयाचें ह्मणून नाहीं. तद्वतच आमच्या दाभाड्यांच्या मागें हें निमकहरामी दुर्दैव सारखें लागलें असून त्यानें खानदेशांतही त्यांची पाठ पुरविण्यास कमी केलें नाहीं. कारण त्रिंबकराव दाभाडे खान-

देशांत जाऊन पोंचण्याच्या पूर्वीच दमाजीराव गायकवाडानें माधवराव बांडे यांचे बंधू त्रिंबकराव बांडे यांस फितूर करून ठेविलें होतें !! दाभाडे तेथें पोंचल्यावर त्यांनीं साधारण तालामाला पाहिल्या बरोबर बांड्याच्या जाळ्यांत न सांपडतां त्याची खोड तेथल्या तेथेंच जिरवून आपण निजाम उल्मुल्क याचे अमलांत औरंगाबाद येथें जाऊन राहिले.

इकडे त्यांचे मागें पेशव्यांनीं त्यांची दरोबस्त दौलत लुटून फस्त केली व इनामें, जहागिरी, सरंजाम वगैरे सर्व हक्क जप्त करून टाकले.

हा प्रकार जरी इतकाच रहाता तरी पुढें मागें दाभाड्यांचा कांहीं झाटल्या कांहीं तरी फायदा होण्याचा संभव होता. पण त्यांचे इमानी नोकर गायकवाड हे तो फायदा कसा होऊं देतात ? त्यांनीं लागलीच पेशव्यांपाशीं बोलणें सुरू करून त्यांस झाटलें कीं, कसें झालें तरी दाभाडे आमचे अन्नदाते यजमान आहेत, करितां त्यांची जहागीर व सरंजाम जप्त होऊन ती स्थिति आह्मी आपल्या डोळ्यांनीं पहावी हें मनास प्रशस्त वाटत नाहीं. करितां त्यांचें सर्व उत्पन्न आमचे स्वाधीन करावें. आह्मी त्यांचेकडे अमदावादेचे सुभे आपाजी गणेश यांस पाठवून त्यांची समजूत घालून त्यांस परत आणवितों. हे आपाजी गणेश दाभाड्यांचे प्राचीन नोकर असून आमचे चांगले स्नेही आहेत.

पेशव्यांच्या डोळ्यांत तरी पहिल्यापासून दाभाडे

सलतच होते. त्यांनीं गायकवाडाच्या म्हणण्याप्रमाणें दाभाड्यांचें सर्व उत्पन्न गायकवाडाच्या स्वाधीन केलें व आपली जप्ति उठविली. इकडे गायकवाडांनीं आपाजी गणेश यास दाभाड्यांकडे औरंगाबादेस पाठविलें.

आपाजी गणेश हे औरंगाबादेस पोंचल्यावर त्यांनीं त्रिंबकराव दाभाडे सेनापति यांस विनंति केली कीं आपण एकवार पेशव्यांकडे चलावें. हें बोलणें ऐकल्याबरोबर पूर्वींच्या अनुभवांवरून दाभाड्यांनीं त्यांस चोखच उत्तर दिलें. ते म्हणाले—गायकवाड हे आमच्या पदरीं जासुदांचे नाईक असतां आमच्या वाडवडिलांनीं त्यांस सुभ्याची कामगिरी सांगून वाढविलें. असें असतां त्यांनीं आमच्याशीं निमकहरामी केली, त्या अर्थीं अशा बेमान मनुष्याची खोड मोडण्याचें सामर्थ्य आमच्या आंगांत येईपर्यंत आह्मी तिकडे मुळींच येत नाहीं !

याप्रकारें दाभाड्यांशीं बोलाचाली चालली असतां तिकडे पेशवे व निजामउल्मुल्क यांची राक्षसभुवनानजीक लढाई होऊन त्यांत निझामाचा पराभव झाला व उभयतांमध्यें पुनः तह होऊन निजामउल्मुल्क आपल्या राजधानीकडे परतले. वाटेंत नबाब साहेबांचा मुक्काम औरंगाबादेस झाला, त्यावेळीं सेनापतींची व त्यांची मुलाकत होऊन सेनापतींनीं आपली सर्व हकीगत निजामास सांगितली. निजाम साहेबांनीं सर्व हकीगत ऐकून घेऊन सांगितलें कीं,

तूर्त पेशवे हे फार जोरावर आहेत. करितां कांहीं काळपर्यंत तुह्मी येथेंच राहून काळ काढा. आह्मी तुह्मांस तुमच्या खर्चाकरितां ह्मणून तूर्त १०,००० रुपयांची जहागीर देतों. वेळ आली ह्मणजे आह्मी तुमचें कार्य करून देऊं.

नबाबाचें हें बोलणें ऐकल्याबरोबर आमच्या एकनिष्ठ दाभाड्यांनीं लख्ख उत्तर दिलें कीं, आह्मास साताऱ्च्या राजाशिवाय कोणाची चाकरी करावयाची नाहीं. व इनाम अगर जहागीरही घ्यावयाची नाहीं. करितां तुमच्या देणगीबद्दल तुमचे मी आभार मानून तुमच्या ह्मणण्याप्रमाणें कांहीं काळ मात्र येथें काढतों!

आबाजी गणेश यानें हा जबाब व आपल्याशीं झालेलें सेनापतीचें बोलणें पुण्यास परत येऊन दमाजीराव गायकवाड यांस कळविलें.

गायकवाडास तें सर्व इष्टच होतें. त्यानें पुन्हां पेशव्यांशीं मसलत करून असें ठरविलें कीं, "त्रिबकराव दाभाडे हे आग्रही असल्यामुळें कोणतेंच बोलणें मान्य करणार नाहींत. करितां त्यांचें सर्व उत्पन्न आमच्या तसलमातीस देऊन गुजराथेचा सुभा आमच्या नांवानें करून द्यावा, ह्मणजे त्यांच्या वतनाचा ऐवज आह्मी त्यांस पोंचता करून देत जाऊं. त्रिंबकराव दाभाडे यांच्या सापत्न मातोश्री तळेगांवीं आहेत त्यांस दरसाल १०,००० रुपये आह्मी खर्चाकरितां देऊं. गुजराथेचें जें उत्पन्न

आहे त्यांत फौजेचा खर्च वजा जातां बाकी राहील तें आह्मी तुह्मांस देत जाऊं. तुमचा मानस या पुढें सेनाखासखेलीचीं वस्त्रें दुपऱ्यास देण्याचा आहे त्या पेक्षां तें पद तुह्मी आह्मांस द्यावें."

याप्रमाणें बोलणें होऊन पेशव्यांनीं बहुतेक बोलणें मान्य केलें. गायकवाडांनीं दाभाड्यांच्या वतनाच्या सोडचिठ्ठ्या घेतल्या. स्वदेशीं जी जहागीर होती ती पेशव्यांनीं आपल्याकडे सामील करून घेतली. सेनाखासखेलीचीं वस्त्रें गायकवाड यांस दिलीं. व मंडळी आपापल्या ठिकाणीं चालती झाली. पुढें गायकवाडांनीं दाभाड्यांच्या वतनाचा ऐवज तर दिलाच नाहीं, पण दाभाडीण बाईस मात्र कबूल केल्याप्रमाणें दहा हजार रुपये देत असत.

या प्रमाणें दाभाड्यांच्या वतनाचा, राज्याचा, व सर्व उत्पन्नाचा त्यांच्या पदरच्या इमानी नोकरानें बेवारा करून टाकला. त्रिंबकराव दाभाडे हे जिवंत होते ह्मणून "दाभाडे" एवढे नांव मात्र त्यांनीं मेहेरबानीनें कायम ठेवलें.

वाचकहो विचार करा! दाभाड्यांचें केवढें उत्पन्न! त्यांची केवढी मर्दुमकी! एकनिष्टपणा तरी किती दांडगा! त्यांनीं जीं इनामें व ज्या जहागिरी मिळविल्या त्या कशा बिकट प्रसंगानें मिळविल्या? आणि एवढ्या जहागिरींचा, उत्पन्नाचा, वतनवाडीचा व अखेर त्यांनीं मिळविलेल्या पदव्यादि भूषणांचा देखील यःकश्चित त्यांनींच वाढविलेल्या एका

बेमान नोकरानें केवढ्यांत अभिलाष केला बरें ! ज्या जहागिरी, इनामें व पदव्यांकरितां दाभाड्यांच्या पुरुषांनीं आपली शिरकमळें धरित्रीस अर्पण केलीं त्याच जहागिरी इनामें व पदव्या एका कपटपटूनें नुसता कुत्र्याचा पाय मांजरावर व मांजराचा पाय कुत्र्यावर घालून एका निमिषांत आपल्याशा केल्या, हा कपटाचा सपाटा लहान समजावयाचा काय? झाली, हीच दाभाड्यांच्या घराण्याची अखेर! केवढें तरी घराणें? कसे पुरूष वाघासारखे गर्जत होते! काय त्यांचा प्रभाव! केवढी उन्नति? पण दुर्दैवाच्या एका सपाट्यानेंच बिचाऱ्यांचें मातेरें झालें. त्यांस जहागिरी व पदव्या दिल्या कोणी व त्या घेतें कोण याचाही विचार आला नां मनांत? शिव शिव! अशीं निष्कपट, थोर कुलीन व एकनिष्ठ घराणींच जर आपल्या देशांत चोहोंकडे असतीं तर दाभाड्यांवर असा प्रसंग कधींच आला नसता. किंवा अशीं घराणीं जर सर्व पृथ्वीभर असतीं तर दाभाड्यांबरोबर आज आपणा सर्व हिंदु लोकांस जो प्रसंग प्राप्त झाला आहे तो देखील न येता खरेंनां? असो.

याप्रमाणें आमच्या सेनापतींचें घराणें केवळ एका बेमानपणानें नाहींसें झालें, त्या पातकाच्या योगानेंच कीं काय कोण जाणें, दाभाड्यांच्या घराण्याबरोबरच थोड्या कमजास्त अंतरानें इतरही घराण्यांचा या वेळेपासून ऱ्हासच होत चालला, असा

अनुभव दृग्गोचर होतो ! आणि तेंही खरेंच आहे कीं, ज्या अर्थी महत्प्रयासानें मिळविलेलीं उत्पन्नें व पदव्या दाभाडच्यां जवळून बुचाडून घेतल्या, त्या अर्थी त्यांच्या घराण्यांतील पुरुषांचा आत्मा किती तळतळला असेल याचा अदमास मुळींच होत नाहीं, त्या अर्थी त्यांच्या तळतळाटानें इतरांचाही नाश होणें ईश्वरी न्यायानें रास्तच ठरतें ! अस्तु. कशीही मनाची समजूत केली तरी आज आपलें हें दाभाडच्यांचें घराणें मालवलें एवढें खचित आहे. तथापि हें कुलीन एक निष्ठ घराणें जरी आज करपून गेल्यासारखें दिसत आहे. तथापि त्यांचें राहिलेलें मूळ तरी ओलसर राहो एवढेंच आपण ईश्वरापाशीं मागितलें पाहिजे. कारण अशा तेजःपुंज घराण्याचा एकादा अंकूर जरी राहिलेला असला तरी राखेंत लपलेल्या ठिणगीस प्रसंगवशात् इंधनें मिळून वारा मिळाला असतां जशी ती प्रफुल्लित होऊन कार्य करते तद्वतच हीं घराणीं प्रसंगविशेषीं पुनः उदय पावून आपल्या देशबांधवांस सुखी करतील यांत तिळप्राय संदेह नाहीं. असो अजूनही आपल्यास दाभाड्यांच्या घराण्याची बरीच कथा ऐकावयाची आहे सबब त्या धोरणाकडे आपण आतां पुनः वळूं.

गायकवाडांनीं पेशव्यांच्या साहायानें अशाप्रकारें बेवारा केल्यामुळें दाभाडयांस पाऊण कोट रुपये ज्या साहुकारांचें देणें होतें त्यांनीं पेशव्यांकडे फिर्यादी

आणल्या. त्यावरून पेशव्यांनीं उत्पन्न तिकडे देणें हा विचार मनांत आणून गायकवाडांनीं दरसाल सहा लक्ष रुपये प्रमाणें सावकारांस देत जावें असा ठराव केला. पेशव्यांची एवढी तरी मेहेरबानीच समजावयाची ! नाहीं तर शक्तीच्या जोरावर तोही पैसा दाभाडयांजवळूनच घ्यावा असा ठराव करते तर त्यांस कोण विचारता होता ?

हा सर्व प्रकार त्रिंबकराव दाभाडे सेनापती औरंगाबादेस होते त्यांस समजला. त्यावरून त्यांस वाटलें कीं, नबाबाचें पेशव्यांपुढें चालणें कठीण आहे. व आपण नबाबाच्या भिस्तीवर उगीच माशा मारीत बसण्यापेक्षां व या कलियुगांतील बेमान माणसांत रहाण्यापेक्षां वेरुळास श्री घृष्णेश्वराचें जोतिर्लिंग आहे तेथें राहून ईश्वराराधना करावी हें उत्तम असें मनांत आणून त्यांनीं वेरुळास प्रयाण केलें.

आपल्या हेतुप्रमाणें कांहीं दिवस देवाची सेवा केल्यावर बिचाऱ्या त्रिंबकराव दाभाडे सेनापती यांनीं तेथेंच आपला जड देह ठेवून परलोकीं गमन केलें ! अर्थात दाभाडयांचा कांटा अनायासेंच नाहींसा झाल्यामुळें गायकवाड यांस निष्कंटक पृथ्वी मिळाल्याचा आनंद झाला आणि दाभाडयांच्या घराण्याचे विचार जागच्या जागींच थिजून गप्प झाले !

त्रिंबकराव दाभाडे यांचा अशा रीतीनें अंत झाला, ही गोष्ट कित्येकांच्या मनास लागली असेल

यांत शंका नाहीं, पण या कलियुगांत व तशांतही या बेमान कालांत त्रिंबकरावासारखा मानी व एक-निष्ठ पुरुष रहाणें फार वाईट आहे, असें समजून श्रीघृष्णेश्वरानेंच आपल्या त्रिंबकरावास महत्कृपाळू होऊन शिवानंद पुरी जो कैलास तेथें अक्षयसुख घेण्यास नेलें अशी समजूत मनास घेतली असतां केवढा बरें आनंद होतो? आपण तीच समजूत तूर्त घेऊन त्रिंबकराव दाभाडे सेनापति यांच्या मरणाचा तूर्त आनंदच मानून आपला कथाभाग पुढें चालवूं.

या प्रमाणें त्रिंबकराव दाभाड्यांचा व त्यांच्या बरोबर दाभाड्यांच्या सर्व वैभवाचा अंत झाला, त्या वेळीं त्यांची कनिष्ट पत्नी लक्ष्मीबाई ही फक्त चार महिन्यांचीच गरोदर होती व ती त्यांचे बरोबर वेरु-ळासच होती तिच्या माहेरीं ही खबर कळताच तिचे बंधु देवसिंगराव ठोके व विश्वासराव ठोके हे उभयतां येऊन त्यांनीं तिला आपले घरीं आंणण्यास नेलें. तेथें गेल्यावर बाई प्रसूत होऊन पुत्ररत्न झालें व त्याचें नांव शिवराव दाभाडे असें ठेविलें.

या बालशिवराव दाभाड्याचा व त्यापुढील पुरु-षांचा वृत्तांत याच भागांत न देतां त्याकरितां आपण निराळाच भाग योजून येथें आतां हा भाग संपवून पुरा करूं.

# भाग दहावा.

( ऱ्हासकाल—सर्व दक्षिणचा ! )

त्रिंबकराव दाभाडे यांच्या मागें यांची स्त्री लक्ष्मीबाई प्रसूत होऊन पुत्ररत्न झालें व त्याचें नांव शिवराव दाभाडे असें ठेविल्याचें पूर्वभागीं कथन केलेंच आहे. पुढें यांचें वय सुमारें अडीच वर्षांचें झाल्यावर लक्ष्मीबाईनें त्यांस पुण्यास आणिलें.

या वेळीं पुण्यास पेशव्यांच्या घराण्यांत थोरले माधवराव व रघुनाथराव यांच्यांत वाद उपस्थित होऊन माधवराव वयांत आला असल्यामुळें त्याणें आपल्या चुलत्यास ह्मणजे राघोबादादास अटकेंत ठेविलें होतें. इतक्यांत इकडे दमाजीरावाचाही काळ झाला. दमाजीरावास चार पुत्र होते. ( १ ) सयाजी, ( २ ) गोविंदराव, ( ३ ) फत्तेसिंग व ( ४ ) मनाजी पैकीं दुसरे गोविंदराव हे पेशव्यांजवळ नौकरीस होते. दमाजी वारल्यावर गोविंदराव याणें पेशव्याशीं बोलणें लाविलें कीं, वडील बंधु सयाजी यांस कारभार हांकण्याची मुळींच अक्कल नाहीं. करितां गुजराथेच्या सुभ्याचीं वस्त्रें मला दिलीं असतां मी तो सर्व कारभार करून शिवाय चाकरीही संभाळीन.

पेशव्यांनीं गोविंदरावाचें हें बोलणें कबूल करून त्यास गुजराथेच्या सुभ्याचीं वस्त्रें दिलीं. ही

बातमी गुजराथेंत फत्तेसिंग यास कळतांच त्यानें पेशव्यांस खडखडीत निरोप पाठविला कीं, गुजराथचीं वस्त्रें सयाजीच्याच नांवानें आलीं पाहिजेत. मुलखाचा बंदोबस्त करण्यास माझा मी तयारच आहें. गोविंदरावाचा कांहीं एक हक्क नाहीं.

फत्तेसिंगाचा असा उघड निरोप आला असतांही पेशव्यांनीं तिकडे लक्ष्य न देतां गोविंदरावास गुजराथेंत रवाना केलें. तिकडे फत्तेसिंगानें लढाईची तयारी करून गोविंदरावास हरकत केली. उभयतांच्या फौजेची लढाई झाली. त्यांत गोविंदरावाचा पराभव होऊन त्यास माघारें यावें लागलें. गोविंदरावाजवळ लढाईच्या खर्चाची कांहींच सामुग्री नव्हती, या कारणानें त्यास लढाई निमित्त कर्ज झालें. त्या वेळीं दाभाडयांचें जें उत्पन्न तसलमातीस दिलेलें होतें तें उत्पन्न गाहाण टाकून सावकारांची फेड केली।

थोडे दिवस गेल्यावर माधवराव पेशवे यांचा अंत झाला. त्यांच्या मागें त्यांचे कनिष्ठ बंधु नारायणराव पेशवे यांस वस्त्रें मिळालीं. तेही लागलीच मारले गेले. त्यावर नारायणरावाची स्त्री गरोदर होती, तिला नेऊन पुरंदरच्या किल्ल्यावर ठेविलें, तेथें ती प्रसूत होऊन पुत्ररत्न झालें. त्याचें नांव सवाई माधवराव ठेवून त्यांच्याच नांवचीं वस्त्रें सातार्‍याहून आणविलीं. इकडे शिवराव दाभाडेही सहा सात वर्षांचे झाले होते. तेव्हां त्यांच्या मा-

तोश्रींनीं पुनः त्यांस पुण्यास आणून पेशव्यांच्या दरबारीं दाद मागितली, पण त्यांच्या देव्हाऱ्यांत देवच ठिकाणीं नसल्यामुळें मुत्सद्दी लोकांनीं तिला उत्तर दिलें कीं, तूर्त शिवराव हे लहान असून पेशवेही लहानच आहेत, करितां तूर्त आह्मी तुम्हांस तुमचीं वतनें मोकळीं करून देतों, तीं घेऊन स्वस्थ असावें; आणि पेशवे वयांत आल्यावर गुजराथचा व सेनापति आणि सेनाखासखेल या पदांचा विचार करूं. असा ठराव होऊन पाऊण लाख रुपये दाभाडयांनीं पेशव्यांस नजराणा द्यावा असाही निश्चय झाला.

इकडे पेशव्यांशीं याप्रमाणें ठराव झाल्याबरोबर गोविंदराव गायकवाड यांणें दाभाडयांचीं वतनें ज्या सावकाराकडे गाहाण ठेविलीं होतीं त्या सावकारांनीं पेशव्यांकडे तकरारी आणिल्या. ते ह्मणाले गोविंदराव गायकवाडांनीं दाभाडयांचीं वतनें गाहाण ठेवून आमच्याकडून ऐवज नेला. त्या ऐवजाची फेड करण्यास गोविंदराव मुळींच कफल्लक आहे. त्याच्याकडे फक्त दावडी गांव मात्र राहिलेला आहे; आणि तुह्मी तर दाभाडयांस त्यांचीं वतनें सोडण्याचें आश्वासन दिलें आहे, तेव्हां अशा स्थितींत आमच्या पैशाची वाट काय?

इतकें बोलणें झाल्यावर पेशव्यांच्या कारभाऱ्यांनीं गायकवाडाकडील कारभारी गोपाळ नाईक तांबेकर यांस बोलावून आणिलें आणि ज्या अर्थीं

गोविंदराव गायकवाड याणें वतनें गाहाण टाकलीं आहेत त्या अर्थी वतनाबद्दलचा ऐवज सयाजीराव व फत्तेसिंग गायकवाड यांनीं भरावा असें फर्माविलें.

गोपाळराव नाईकानें यावर एकच चोख उत्तर दिलें. तें असें कीं, गोविंदराव गायकवाडानें वतनें गाहाण ठेवून घरप्रपंच केला नाहीं. उलट आमच्यावर चढाई करून आला होता. याकरितां तो ऐवज आमच्याकडून साफ मिळावयाचा नाहीं! अर्थात हें उत्तर वाजवीच असल्यामुळें पेशव्यांच्या कारभाऱ्यांस पुढें बोलण्यास जागाच राहिली नाहीं.

पेशव्यांनीं हा ऐवज देण्यास गायकवाडास भागही पाडलें असतें, पण या वेळीं सवाई माधवरावांचें वय लहान असून राघोबादादांचीं कारस्थानें इंग्रजांच्या बगलेंत शिरून जारी चालू होतीं. याकरितां जर गायकवाडास तेढा जबाब दिला तर न जाणो गायकवाड राघोबादादास मिळून आपल्या नाशास उद्युक्त होईल, या भीतीनें पेशव्यांच्या कारभाऱ्यांनीं तो प्रश्न तसाच मोघमांत ठेवून लक्ष्मीबाई दाभाडे यांस कळविलें कीं, गायकवाड तुमचे चाकर व तुह्मी त्यांचे यजमान या करितां तुह्मी आपलीं वतनें पदरचे पैसे भरून सोडवून घ्यावीं. तुमचें वतन बारा वर्षें फत्तेसिंग गायकवाड यांजकडे तसलमातीस होतें, पण तो पैका आह्मी मुळींच घेतला नाहीं, सबब फत्तेसिंग गायकवाड देशीं आल्यावर तो ऐवज

त्यांचेकडून तुह्मास देववूं. शिवाय हा सावकाराचा ऐवजही त्यांस देण्यास सांगूं.

गोविंदराव गायकवाड यांनीं दाभाड्यांच्या वतनावर एक लक्ष तेरा हजार चारशें नव्याणव रुपये काढले होते. अखेरीस हे रुपये लक्ष्मीबाई दाभाडे यांनीं भरून वतनें सोडवून घेतलीं. आणि वतनांचा वगैरे सर्व कारभार स्वतः लक्ष्मीबाई पाहूं लागल्या.

दाभाड्यांचे इमानी नोकर गायकवाड यांजला हें वतन सुटलेलें देखील पाहूं सकवलें नाहीं! त्यांनीं आपल्या कारभाऱ्यांच्या मार्फत या वतनांत घालवतील तेवढे बखेडे घातले. परंतु या वतनांत पेशव्यांच्या पदरच्या पुष्कळ सरदारांच्या जहागिरी असल्यामुळें आपण विशेष खलेल केली असतां पेशव्यांचें व आपलें वांकडें येईल एवढ्याच भीतीनें गायकवाडांनीं दाभाड्यांच्या वतनांचा सर्वस्वी अपहार केला नाहीं.

लक्ष्मीबाई दाभाडे यांणी आपल्या वतनवाडीवर जे गायकवाडांचे अंमलदार होते ते तसेच कायम ठेविले. आपण जें कर्ज काढलें होतें त्याच्या मोबदल्यांत जीं वतनें गुंतविलीं होतीं, तीं तशींच सावकारांच्या वहिवाटीस ठेवून फक्त कागदपत्रांचे दाखले मात्र आपल्या नांवचे करून घेतले. या रीतीनें अगदींच फाटलेलें छत लक्ष्मीबाई ठीकठाक करूं पहात आहे तोंच दुर्दैवाचा आणखी एक हल्ला या दाभाड्यांच्या घराण्यावर झाला. तो हल्ला हाच कीं, ज्या शिवरावाच्या जिवावर लक्ष्मीबाई आपला

आशातंतु ठेवून संस्थानची जमबाजमव करीत होती ते शिवराव दाभाडे आपल्या वयाच्या पुऱ्या दशींतही न येतां अकस्मात् मृत्यु पावले !

या अकस्मिक घाल्यामुळें अर्थात बिचाऱ्या लक्ष्मीबाई दाभाडीचे हातपाय जागच्या जागींच थंड झाले. तथापि ती बाई पुऱ्या धैर्याची व पूर्ण कारस्थानी असल्यामुळें तिनें आपला पुत्रशोक बाजूस ठेवून लागलीच पुण्यास आली आणि पेशव्यांच्या दरबारांत हळूच संधान बांधून पंचावन्न हजार रुपये नजराणा भरून आपल्या गोत्रजांपैकीं एक पुरुष दाभाड्यांच्या वेलविस्तारास्तव आपल्या मांडीवर घेतला. आणि त्याचें नांव यशवंतराव दाभाडे असें ठेविलें.

लक्ष्मीबाई दाभाडे यांनीं वतनवाड्यांची जी व्यवस्था लाविली होती, तीच व्यवस्था यशवंतराव दाभाडे वयांत येऊन आपला कारभार पाहूं लागे पर्यंत चालली होती. ते स्वतः आपला कारभार पाहूं लागले तेव्हां त्यांनीं संस्थानच्या कर्जाची व्याजासुद्धां फेड करून आपलीं वतनें सावकारांच्या वहिवाटींतून मोकळीं केली. लक्ष्मीबाई हुषार तर खरीच, पण बोलून चालून बायको मनुष्य पडल्यामुळें हिशेबाच्या कामांत दाभाड्यांचे कारभारी व वतनावरील मामलेदार हे एक होऊन त्यांनीं कर्जाच्या बेरजा खूप फुगविल्या होत्या, परंतु नानाफडनविसाच्या कानावर या गोष्टी जाऊन त्यांनीं सावकारांचा तंटा लागलीच उलगडून टाकला.

इतक्यांत मोठी उलाढाल पुनः झाली. साताराचें छत्रपति रामराजे यांस देवाज्ञा झाली. पण राजे हे यावेळीं नामधारीच असल्यामुळें त्यांच्या मृत्यूनें राज्यांत फारसा फरक झाला नाहीं. परंतु दुर्दैवानें याच संधीस पुण्याचे पेशवे सवाई माधवराव यांसही देवाज्ञा झाली. त्यामुळें एथून तेथून सर्व राज्यव्यवस्थेंत एकच घोळ झाला. पेशवे कुळांत दोन शाखा होत्या पैकीं सवाई माधवरावाच्या मरणांत एक शाखा अजीच जिरली गेल्यामुळें पेशवे पदास काय ते अधिकारी राघोबादादाचे पुत्रच राहिले.

या दोन्ही पुरुषांच्या मरणानें यशवंतराव दाभाडे यांनीं आपल्या संस्थानचा जो घाट घातला होता, तो सर्व विसकटून गेला आणि यशवंतराव दाभाडे यांस पुनः आपल्या नवीन मसलतीचा पाया रचावा लागला.

साताराच्या गादीवर शाहूराजांची स्थापना झाली व त्यांचेच हातून पेशवाईची वस्त्रें बाजीराव रघुनाथ यांस मिळालीं. हीं वस्त्रें दौलतराव शिंदे यांच्या उद्योगानें बाजीरावास प्राप्त झालीं हें इतिहास प्रसिद्ध आहेच. त्यामुळें दौलतराव शिंद्यचें वजन अर्थांतच बाजीरावावर पूर्णपणें होतें हें एक येथें लक्ष्यांत ठेविलें पाहिजे.

राज्यांतील व्यवस्था इतक्या बेतास आल्यावर यशवंतराव दाभाडे यांनीं दौलतराव शिंदे व नाना फडनवीस यांच्या मार्फत श्रीमंत रावबाजी यांच्याशीं गुजराथ प्रांत, सेनापतिचीं व सेनाखासखेलीचीं वस्त्रें

आमचीं आह्मांस परत मिळावीं ह्मणून बोलणें सुरू केलें. त्यावर बाजीरावानें उत्तर दिलें कीं, आह्मी नुकतेच पदारूढ झाल्यामुळें अद्यापपर्यंत आमचा बसावा तसा बस राज्यांत बसलेला नाहीं. तशांतही गायकवाड हल्लीं फौजबंद असल्यामुळें त्यांच्यावर सक्ती तूर्त करतां येत नाहीं. करितां पाऊण लक्ष रुपये नजराणा ठरवून सेनापतीचीं वस्त्रें व खानदेशांतील ५० हजारांचा सरंजाम आज दामाड्यांनीं घेऊन स्वस्थ असावें. पुढें प्रसंगोपात गुजराथेच्या संबंधानेंही विचार होईल.

या मसलतीस बाजीरावानें आपले बंधु चिमाजी आपा यांचीही सल्ला घेतली, त्यावरून चिमाजी आपानें सांगितलें कीं, आपल्या घराण्याशीं प्रथम पासूनच दामाडे वाकून आहेत. करितां प्रांत अगर वस्त्रें देण्यांत तात्पर्य नाहीं. पुढें मागें ते आपल्याच नाशास कारण होण्याचा संभव आहे. चिमाजी आपानें ही जरी मसलत दिली, तथापि दौलतराव शिंद्याच्या मनांत दामाड्यांचें बरें व्हावें असें फार असल्यामुळें व बाजीरावावर शिंद्यांचे पूर्ण उपकार असल्यामुळें आणि बाजीराव नात्या भ्याड असल्यामुळें त्याच्याच्यानें दामाड्यांस उघड रीतीनें वाटाण्याच्या अक्षता लावितां आल्या नाहींत. व कबूल केल्याप्रमाणें खानदेशच्या पन्नास हजारांच्या सनदा व सेनापतीचीं वस्त्रें दामाड्यांस देण्याचें बाजीरावानें कबूल केलें. हें

बोलणें आलिजाबहादर शिंदे यांजकडील सखाराम सर्जेराव घाटगे व पेशव्यांकडील बाळाजी कुंजर यांच्या मार्फतीनें झालें. आणि लागलीच शाहुराजे यांजकडून सेनापतीचीं वस्त्रें बाजीरावांनीं आणवून दाभाड्यांस देवविलीं.

आमच्या दाभाड्यांच्या घराण्याचें नष्टचर्य येथें देखील संपलें नाहीं. एकाद्या वीर पुरुषाचें शव पडलें असतां तें शव कोणाचें आहे हें मनांत देखील न आणतां काक गृध्रादि अमंगल व नीच प्राणी तें मृत शरीर तोड तोडून उदर पूर्ती करण्यास जसे कमी करीत नाहींत तद्वातच या घराण्यास पडित काल झाला असतांही त्या पडित कालांत देखील या घराण्याचें लचके तोडण्यास लोकांनीं कमी केलें नाहीं. तो सर्व वृत्तांत वाचकांच्या लक्ष्यांत पुढील हकीगतीवरून सहज येईलच.

वर आह्मी सांगितलेंच आहे कीं, दाभाड्यांच्या मसलतींत बाळोबा कुंजर हे होते. त्यांनीं यशवंतराव दाभाडे यांस सेनापतीचीं वस्त्रें मिळाल्यावर खानदेशाच्या सरंजामाबद्दल दाभाड्यांशीं बोलणें लाविलें कीं, या बाबतींत कांहीं तरी पान सुपारी मिळाली पाहिजे. त्यावर दाभाड्यांनीं स्पष्ट सांगितलें कीं, खानदेशच्या सनदा आमचे नांवें करून देऊन आमचा अंमल पूर्ण रीतीनें बसवून द्यावा आणि या कामगिरीकरितां आह्मी पाऊण लाख रुपये कबूल केल्या प्रमाणें देतों. पण हें बोलणें कुंजर यास मान्य

झालें नाहीं. कारण हे रुपये पेशव्यांच्या हातीं जाणार असल्यामुळें या कामांत आपला हात कांहींच भिजत नाहीं असें कुंजर यास भासलें. आणि तेव्हां करितां कुंजरांनीं दाभाड्यांस सांगितलें कीं, आह्मी पाहिजे तसा प्रयत्न करून तुमचा अंमल खानदेशांत सुरळीतपणें बसवून देतों. याच्या मोबदला तर्फ कडेपठार व तर्फ सासवड येथील सरपाटिलकीचीं वतनें आह्मांस पुत्र पौत्रादि वंशपरंपरेनें करून द्यावीं!

"आडला नारायण गाढवाचे पाय धरी" या वृद्ध वचनानुसार यशवंतराव दाभाडे यांनीं आपल्या कारभाऱ्यांची वगैरे संमत्ति घेऊन आणि आपलीं सर्व कामें सुरळीत करून देऊं अशी कुंजराकडून खात्री करून घेऊन सदरील दोन्ही तर्फांच्या सरपाटिलकीच्या सनदा कुंजराच्या नांवें करून दिल्या.

बाळोजी कुंजरानें ही पाटिलकी मिळाल्याबरोबर बाजीरावाकडून खानदेशाची ५० हजारांची सनद दाभाड्यांकडे पाठवून दिली. यशवंतराव दाभाडे सेनापति यांनीं आपला कारकून सदाशिवराव फडणीस याच्या स्वाधीन करून त्यास खानदेशांत अंमल बसविण्याकरितां रवाना केलें. इतक्यांत बाळोजी कुंजर यांनीं पाऊण लाखांपैकीं कांहीं ऐवज आतां द्यावा व कांहीं ऐवज अंमलाची पुरी बनावणी झाल्यावर द्यावा, असें दाभाड्यांचे कारकून मोरोराम यांजकडे बोलणें लाविलें. तें बोलणें

यशवंतराव दाभाडे यांस कळतांच त्यांनीं कुंजर यां-कडे निरनिराळ्या रकमांनीं सुमारें ५९,८११ रु-पयांचा भरणा केला. व बाकी फक्त १५,१८९ करारा पैकीं राहिले होतें.

इकडे दाभाड्यांच्या तर्फे सदाशिवराव फडणीस हा खानदेशांत अमलबजावणीस गेला असतां तेथें दाभाड्यांचा अंमल मुळींच बसेना. बाळोजी कुंजरानें अंमल बसवून देतों ह्मणून कबूल केलें असून सदा-शिवराव फडणीस खानदेशांत आठ महिने राहिला. तरी कुंजराकडून अंमल बजावणीची कांहीं एक त-र्तूद झाली नाहीं. अखेर सदाशिवराव स्वार शिबंदीनिशीं परत आला. तेव्हां दाभाड्यांनीं तो मजकूर बळोजी कुंजीर यांच्या कानावर घातला.

बाळोजी कुंजीर यांनीं तो सर्व मजकूर ऐकून घे-ऊन यशवंतराव यांस सांगून पाठविलें कीं, सरका-रच्या ऐवजाचा भरणा ७५००० रुपयांचा कराव-याचा तो आह्मी सावकराकडून उसनवार रक्कम का-ढून केला. त्याचे दोहोंच्याप्रमाणें आज मित्ती पर्यंतचें व्याज व बारा रुपये शेकडच्याप्रमाणें मनोती मिळून ६२००० रुपये झाले. तुमचे कडून फक्त ५९,८११ रुपये आले असून मूळ रकमेंपैकीं १५,१८९ रुपये बाकी राहिली, ती बाकी व व्याज मनोतीचे ६२००० रुपये मिळून तुमचेकडे आज मित्तीस ७७,१८९ रुपये झाले, त्यांत २,१८९ रुपयांची तुह्मास सूट दिली आहे, बाकी ७५,०००

रुपयांचा भरणा तुह्मी तावडतोब करावा, अगर आ-ह्मांस तितक्या रुपयांचे खत लिहून द्यावें ह्मणजे आह्मी तुमचा अंमल खानदेशांत बसवून देऊं.

वाचकहो, ज्या दाभाड्यांचे नुसतें नांव ऐकल्या बरोबर गर्भिणी स्त्रिया गर्भ टाकीत असत, त्याच दाभाड्यांच्या घराण्यांतील पुरुषांकडून लोक निव्वळ आडवून पैसे उपटीत आहेत तर हा महिमा कशाचा बरें! हा काल महिमा नव्हे काय? दुर्दैव एकवार हात धुऊन पाठीस लागलें ह्मणजे मनुष्यास कोणत्या थरास नेऊन पोंचवील याचा कांहीं तरी थांग लागतो काय? बाळोजी कुंजीर दाभाड्यांशीं अगदीं इमानानेंच वागला ना? पण बाळोजी कुंजीर बाजीरावासारख्या राज्यबुडव्या पुरुषाचा नर ताईत बनून राहिला होता, तर त्यानें आपल्या या स्फटिकवत घराण्यावर कापट्याची झडप मारून तें घराणें आणखी रसातळास पोंचविण्याची मसलत केली यांत नवल तें कोणतें? असो. तूर्त आपण आपल्या हकीगतीकडेच वळूं.

बाळोजी कुंजीरानें दाभाड्यांस हा गळ घातला, त्यावेळीं दाभाड्यांच्या दुर्दैवानें दौलतराव शिंदे हे हिंदुस्थानांत निघून गेले असल्यामुळें दाभाड्यांच्या तर्फेनें बोलणें करण्यास कोणीच राहिलें नाहीं. बाजीरावाचे दरबारांत तर कुंजीर काय करील तें खरें असें असल्यामुळें यशवंतराव दाभाड्यांचा कांहीं एक इलाज चालेना.

बाळोजींकडून चिटको रघुनाथ, दामाजीपंत, बाळाजी-पंत असे तीन असामी यशवंतराव दाभाडे यांच्याशीं बोलणें लावण्याकरितां आले. आणि त्यांनीं दाभाड्यास कळविलें कीं, आज बाळोजी कुंजीर करतील ती पूर्वदिशा आहे. करितां तुह्मी मुकाट्यानें पाऊण लाखाचें खत लिहून द्यावें. तसें तुमचेकडून न होईल तर बाळोजी बुवा तुमच्याशीं वांकडे होऊन तुह्मास रहावयास घर देखील ठेवणार नाहींत याचा विचार करावा.

हा निरोप ऐकल्यावर यशवंतराव दाभाडे यांनीं विचार केला कीं, हे ह्मणतात तेंच खरें आहे. आज आपण कुंजीराशीं घासाघीस केल्यास दुर्घट प्रसंगांत पडून अह्मांसही मोताद व्हावें लागेल. त्यापेक्षां आज खत लिहून देऊन मोकळें व्हावें व पुढें अनुकूळ प्रसंग येण्याची वाट पहावी, हेंच उत्तम असें मनांत अणून त्यांनीं कुंजीर यास खत लिहून देण्याची कबुलायत केली.

कुंजीरांच्या ह्मणण्याप्रमाणें दाभाडे यांनीं खत लिहून दिल्यावर बाळोजी बुवांनी तुह्मास फौजेचा खर्च पेशव्यांकडून देऊन खानदेशाचे बंदोबस्तास पाठवितों आणि तुह्मी तिकडे गेल्यावर जिवाजी यशवंत यांनीं केलेले बंडाचा बंदोबस्त करून तुह्मी आपला अंमलही बसवून घ्यावा असें सांगितलें.

कुंजीर बुवांचें हें ह्मणणें आमच्या यशवंतरावास खरें वाटून त्यांनीं बाळोजीच्या ह्मणण्या प्रमाणें आ-

पळे नवळ फौज ठेविली. आणि तीन महिने पर्यंत पुण्यास राहून हुकुमाची वाट पाहिली. कुंजिरांनीं आज हुकूम देतों, उद्या हुकूम देतों असें सांगून दाभाड्यांस पुरें झुलविलें तों पर्यंत फौजेचा तनखा वाढला जाऊन दाभाडयांस तसदी पडूं लागली. पेशव्यांकडून हुकूम मिळेना व खर्चावयासही मिळेना अखेरीस यशवंतरावांनीं फारच पाठ पुरविल्यामुळें बाळोजी कुंजीरानें बाजीरावाचा हुकूम मिळवून दाभाड्यांस दिला. आणि सांगितलें कीं तुह्मी पुढें चला तों आह्मी मागाहून तुमच्या खर्चाची सर्व व्यवस्था लावतों.

कुंजिराचें हें बोलणें तरी खरें असेल असें आमच्या या भोळ्या निष्कपट यशवंतरावास वाटून त्यांनीं आपल्या फौजेसुद्धां पुण्याहून कूच केलें. तों ते सुमारें पुण्यापासून वीस कोस गेले असतील नसतील इतक्यांत बाजीराव पेशव्यांकडून त्यांस पत्र गेलें कीं, खानदेशांतील शिवाजी यशवंताच्या बंडाचा बंदोबस्त झाला, करितां तुह्मी पुढें जाण्याचे करूं नये!

बिचाऱ्या यशवंतराव दाभाड्यांस तेथूनच पुनः पुण्यास परत यावें लागलें. त्यांनीं जी फौज ठेविली होती ती जदीद ह्मणजे सर्वच नवीन भर्तीची असल्यामुळें परत आल्यावर त्यांस फौजेची कसणी विशेष लागली. त्यांनीं सावकाराकडून कांहीं पैसे काढून फौजेस दिले, पण तेवढ्यानें मुळींच भागलें नाहीं. फौजेचा एकसारखा तगादा बसला. हें

सर्व वृत्त यशवंतराव दामाडे यांनीं बाळोजी बुवांच्या कानावर घालून त्यांस आणखी असेंही सांगितलें कीं, तुह्मी सांगितल्यावरून आह्मी ही फौज ठेविली आहे करितां तिचा तनखा तीस देऊन आम्हांस मुक्त करावें.

यावर कुंजीर यांनीं लख्ख जबाब दिला कीं, फौजेचा व आमचा बिलकुल संबंध नाहीं. आह्मी तुमच्या मोहोब्बती खातर पाहिजे असल्यास दुसरी फौज पाठवून तुमच्या फौजेचा तगादा उठवून लावितों.

यशवंतराव दामाडच्यांनीं असलें अनुचित कर्म आजपर्यंत आपल्या पूर्वजांत कोणींच केलें नसून आज आपल्यावर तो प्रसंग आला आहे, असें मनांत आणून कुंजीराची ती सर्व मसलत नापसंत केली आणि कुंजीराचे कारभारी यांस बोलावून आणून त्यांच्याशीं बोलणें घातलें कीं, बाळोजीबुवांच्या सांगण्यावर आह्मी एवढी फौज ठेविली असें असतां फौजेचा आमचा संबंध नाहीं असें उत्तर देतात एवढेंच नव्हे, तर पुनः फौजेस तनख्याचे रुपये दामाडच्यांकडून सक्त तगादा करून घ्या ह्मणून भरां देतात तेव्हां त्यांचे मनांत तरी काय आहे हें कळूं द्या. आजपर्यंत आह्मी त्यांच्या मर्जी बरहुकूम चालों असून आमच्यावर दगे फटके होतात हें कसें?

यावर कुंजीराकडील कारभाऱ्यांनीं उत्तर दिलें कीं, बाळोजीबुवा आज जबरदस्त आहेत. करित

त्यांच्या ह्मणण्याप्रमाणें तुह्मी वागलेंच पाहिजे. सबब तुह्मांस जर हल्लींच्या अडचणींतून पार पडून घ्यावयाचें आहे तर पुणें प्रांतांतील ३६० गांवांची सरपाटील-की तुह्मी कुंजीर यांस लिहून द्यावी. तसें तुह्मी न कराल तर तुमचीं मुलें बाळें देखील जागीं राहणार नाहींत !

हा दुष्टा अधमानो ! सूर्यनारायण खलग्रहाच्या सपाट्यांत सांपडला असें जाणून तुह्मी त्याचा उपमर्द करून त्याच्या आंगावर उष्टी चूळ टाकण्याचा नीच प्रयत्न करतां काय ? पण ती चूळ तुमच्याच आं-गावर उलटून पडेल याचें भान तरी तुह्मांस आहे काय ! अरे नीचानो, जें हल्लीं तुह्मी परतंत्रतेचें सुख यथेच्छ भोगीत आहां तें तरी याच तुमच्या हलकट कृतींचें प्रायश्चित्त आहे असेंच समजा ! आणि या-वच्चंद्र दिवाकरौ असेच रवरव यातनेंत ऐषआरामानें पडले रहा जा !! असो. व्यर्थ शिव्या शापांचा शीण करून काय होणार ? आतां कितीही शिव्या अगर कितीही शाप दिले तरी आपल्या या दाभाडे घराण्याचें झालेलें नुकसान भरून का यावयाचें आहे ? करितां क्षोभशांति करून आपल्यास आरं-भलेलें काम तडीस नेलें पाहिजे. ह्मणून आतां सावध चित्तानें ऐका !

कुंजीराच्या कारभाऱ्यांचे हे बोल ऐकून यशवं-तराव दाभाड्यांच्या अंतःकरणाचा दाह झाला. पण विंचवाची नांगी दाबल्यावर तो काय करणार ? सा-

पाचें मुंडकें दाबल्यावर त्याचें काय चालणार? वाघाच्या गळ्यांत सापळदंड अडकविल्यावर तो कोणाच्या नरडीचा घोट घेणार? तद्वत यशवंतरावाच्या हातीं कांहींच राहिलें नसल्यामुळें तो तरी काय करणार?

अखेर त्यानें संतापासरसें इतकेंच सांगितलें कीं, आ तुह्मास जशी सनद पाहिजे तशी तुह्मी करून आणा, ह्मणजे मी त्यावर सही करून तुमचे मनोरथ पूर्ण करतों!!

मतलबी मनुष्यास काय? पडत्या फळाची आज्ञा मिळाली ह्मणजे पुरे. ती रागानें मिळो अगर लोभानें मिळो. त्यांचा मतलब साधला ह्मणजे बस. दरवडेखोर एकाद्याच्या घरावर आले असतां त्यास कोणी रागानें अथवा लोभानें दिलें तरी तें टाकतात काय? त्याचप्रमाणें आमच्या कुंजीरबुवांच्या कारभाऱ्यांनीं यशवंतरावाचे रागाचे शब्द बाहेर पडले तसेच झेलून आपल्या इमानी यजमानाकडून पाहिजे तशा सनदांचा मसुदा करून आणून तो दाभाड्यांच्या पुढें टाकिला.

त्या मसुद्यांत मुख्य मुद्याचीं अक्षरें " आह्मी कुंजीर यांशीं बहुत खुषी होऊन पुणें देशचे तीनशें साठ गांव आमचे सरपाटीलकीचे आहेत ते पुत्रपौत्रादि वंश परंपरेनें इनाम करून दिल्हे " इतकीं होतीं. तो मसुदा वाचून पाहिल्यावर यशवंतराव दाभाडे यांनीं त्यांत " वक्त आह्मावर कुंजीर यांनीं

या तऱ्हेचा मातजा त्यावर दृष्टि देऊन, नाइलाज होऊन" इतकीं अक्षरें घालून सनद करून देऊन ती त्यांच्या कारभाऱ्यांबरोबर पाठवून दिली.

ही सनद बाळोजी कुंजीर यांनीं पाहिल्यावर ही जुलमानें आडवून घेतली असें उघड होतें, करितां दाभाडे यांस २५००० रुपये रोख द्यावे आणि दुसरी सनद करून घ्यावी असें कुंजिरांनीं ठरवून आपले कारभारी पुनः सेनापतीकडे पाठविले. ते आल्यावर यशवंतरावांनीं कळविलें कीं, तुह्मास पाहिजे तशी सनद लिहून आणा आणि मी त्यावर सही करून देतों.

नंतर कुंजीर यांनीं मनमानेल त्या रीतीची सनद करून आणली ती दाभाड्यांनीं वाचून पाहिल्यावर उत्तर दिलें कीं, आमच्या मातोश्री लक्ष्मीबाई या अद्याप जिवंत आहेत करितां असल्या सनदेवर शिक्का मोर्तब करण्याचा अधिकार त्यांचा आहे. मला तो अधिकार नसल्यामुळें तुह्मी त्यांचेकडे जाऊन त्यांची समत्ति मिळवावी.

ही गोष्ट घडली त्या दिवसपर्यंत लक्ष्मीबाई दाभाडे यांस फौजेच्या तगाद्या मुळें तिसरें उपोषण होतें. त्या सपाट्यांतच कुंजराकडील कारभारी लक्ष्मीबाईकडे जाऊन त्यांनीं बाईस वर सांगितलेल्या सनदेवर शिक्का मोरतब करण्यास सांगितलें. बाईनें सनदेंतील मजकूर ऐकून घेऊन संतापानें शिक्का मोरतब त्या लोकांच्या आंगावर फेंकून देऊन सांगितलें कीं, मी

असल्या सनदेवर शिक्का मोर्तब करण्यास सांगणार नाहीं. तुम्ही पाहिजे असल्यास सनदेवर आपल्या हातानेंच खुशाल शिक्का मोरतब करून घ्या आणि पाहिजे तें करा. यापेक्षां तुम्ही मजवर अधिक प्रसंग कराल तर मी याच क्षणीं प्राण देईन.

लक्ष्मीबाईचे हे शद्ब ऐकून कारभारी मंडळ चपापलें, तथापि त्यांनीं आपल्या मतलबांत कमतरपणा येऊं दिला नाहीं. त्यांनीं बाईनें रागानें फेंकून दिलेलें शिक्का मोरतब आपलें बरोबर घेऊन पुनः येशवंतराव दाभाडे सेनापति यांजकडे आले, आणि झालेला वृत्तांत त्यांस कळवून तुह्मी तरी आतां शिक्कामोर्तब करा ह्मणून सांगितलें. येशवंतराव दाभाडयांनीं एकच जबाब दिला कीं, मातोश्रींनीं या बाबतींत शपथ घातली आहे. सबब मला या सनदेवर शिक्कामोर्तब करणें नाहीं. तुह्मास वाटत असेल तर तुह्मीच आपल्या हातानें शिक्कामोर्तब करून घेऊन खुशाल जा !

सेनापतीनीं एवढें सांगितल्यावर कारभाऱ्यांनीं आपल्याच हातानें कुंजराच्या सनदेवर दाभाडयाचें शिक्कामोर्तब करून घेऊन सनद तयार केली. मात्र कुंजिरांच्या त्या कारभाऱ्यांनीं जातांना एवढेंच सांगितलें कीं, पुढेंमागें जर आम्हांस या बाबतींत कोणी विचारील तर आह्मी या सनदेवर दामाडयांनीं आपल्या हातानें शिक्कामोर्तब केलें नसून आह्मी आपल्या हातानें तें करून घेतलें आहे व सनदही दा-

भाड्यांच्या खुषीनें झालेली नाहीं असें ईश्वरास स्म-रून सांगूं.

असें ह्मणून कारभारी मंडळ कुंजिराकडे चालतें झालें आणि त्यांनीं ती बनावट सनद आपल्या यज-मानास दिली. यजमानांनीं मुळींच मनांत शंका न आणतां या सनदेंत लिहिल्याप्रमाणें अंमल करण्या-स मागील शाहु महाराजांच्या सनदा व इतर का-गदपत्र सेनापतीकडे मागावयास पाठविलें. त्या वेळीं लक्ष्मीबाईनें व सेनापतींनीं ते कागदपत्र देण्याचें मुळीं च नाकारलें. बाळोजी कुंजिरानें लागलीच सर-पाटिलकीच्या अंमल बजाविणीची तयारी केली. आणि मनांत आणल्या प्रमाणें २५००० रुपयांची रक्कम दाभाड्यांकडे पाठवून दिली.

यशवंतरावांनीं हे २५००० रुपये व आपल्या जवळची आणखी चीजवस्त मोडून फौजेचा तगादा वारून टाकला व मनांत कुंजिराच्या या कृष्णकार-स्थानाचा विचार करीत स्वस्थ राहिले.

तिकडे कुंजिरावर रावबाजीची पूर्ण मेहरबानी असल्यामुळें त्यांनीं कुंजिराच्या सर्व सनदा मान्य करून आपल्या पदरच्या मामलेदार लोकांस कुंजि-जिराच्या सरपाटिलकीच्या अंमलाची बजावणी क-रावी ह्मणून धडका हुकूम सोडले.

परराष्ट्राचे तर असोच. पण स्वराज्यांत देखील लोकांच्या सनदांची पाहिजे तशी व्यवस्था होत असे हें पाहून मोठा अचंबा वाटतो. तथापि अ-

शा लबाडच्या ज्या राज्यांत होत असून सत्तेच्या जोरानें त्या पचल्याही जातात आणि लोकांचे तळ तळाट मात्र राज्यकर्त्यावर पडतात तें राज्य फार दिवस निभावत नाहीं हें या बाजीरावीवरून उघड ठरवितां येतें. अस्तु.

या वेळीं कुंभिरांचा चालता काळ असल्यामुळें त्यांनीं वरील बनावट सनदेवर जमीनदार लोकांच्या साक्षी देखील घालून घेतल्या ! ! असो. विपरीत काळ आला ह्मणजे डोंगराची देखील राई होते, मग दाभाडयांचें सर्वस्वी जाऊन त्या घराण्यास हलाकी आली यांत फारसें नवल तें कोणतें ?

याच संधानांत येशवंतराव होळकर यांनीं पुण्या-वर स्वारी केली. त्या वेळीं राव बाजींनीं पलायन करून इंग्रजांचीं पाठ धरण्या करितां वसईस गेले. व दाभाडे सेनापति यांस निरोप केला कीं, तुह्मी तळेगांव सोडून तूर्त दुसऱ्या ठिकाणीं जावें. त्याव-रून येशवंतराव दाभाडे लोहगडास जाऊन राहिले.

इकडे होळकरांनीं बाजीरावाच्या जागीं त्यांचे बंधु अमृतराव यांची स्थापना केली. त्या वेळीं अमृत-रावांनीं दाभाडयांस बोलावणें पाठविलें,परंतु बाजीरा-वास इंग्रज सरकारानें आश्रय दिला आहे, हें समजून ते अमृतरावाच्या बोलावण्याप्रमाणें आले नाहींत. तो रोष मनांत आणून होळकर व पेशवे यांनीं तळेगांवावर चाल करून दाभाडयांचें सर्व घरदार व जीनवस्त लुटून नेली.

तिकडे बाजीरावास इंग्रजांनीं पाठीशीं घालून त्याच्याबरोबर आपली कांहीं फौज देऊन त्यास पुण्याकडे रवाना केलें. ही बातमी अमृतराव व होळकर यांस कळल्याबरोबर त्यांनीं आपला गाशा गुंडाळून ते खानदेशाकडे चालते झाले. रावबाजींनीं कल्याणाहून यशवंतराव दाभाडे यांस पत्र पाठवून आणविलें. यशवंतरावही कल्याणास जाऊन बाजीरावाबरोबर पुण्यास आले.

रावबाजी पुण्यास आल्यावर त्यांनीं दाभाड्यांशीं पुनः बोलणें लाविलें कीं, तुह्माकडे पन्नास हजारांचा सरंजाम आहे त्यापैकीं ५० स्वार आमचे चाकरीस पाठवावे. यावर यशवंतराव यांनीं हा सरंजाम स्वारांस नसून जातीकडे आहे सबब यांतून स्वार देतां येत नाहींत असा जबाब दिला. त्यावर रावबाजींनीं सांगितलें कीं, हा सरंजाम केवळ दैलतराव शिंदे यांच्या भिडे खातर दिला होता सबब आतां तुह्मांस चाकरी केली पाहिजे.

रावबाजीचा हा निरोप ऐकून पुनः दाभाड्यांनीं एकच जबाब दिला कीं, आजपर्यंत दाभाड्यांच्या वंशांत छत्रपतीशिवाय कोणाचीही चाकरी ह्मणून केली नाहीं आणि म्हणूनच मी तुमची चाकरी करून आतां वंशास डाग लावणार नाहीं. असा निरोप पाठवून वै या दरबारांत बेदाद आहे, कुंजिरांनीं लबाड्या करून बुडविलें तरी दाद ह्मणून लागली नाहीं आणि यापुढें जरी यांच्याशीं संबंध

ठेविला तरी हे पाहिजे त्या रीतीनें आह्मास बुड-
विल्यावांचून रहाणार नाहींत असें मनांत आणून
यशवंतराव दाभाडे स्वस्थपणें तळेगांवीं राहिले.

कर्म धर्म संयोगानें याच सुमारास दौलतराव
शिंदे यांच्या कन्येशीं यशवंतरावांचे चिरंजीव त्रिंब-
कराव दाभाडे यांचें लग्न जमून येऊन त्यांस शिंद्यां-
कडून मूळ आलें. तेव्हां सर्वच मंडळी ग्वाल्हेरीस
निघून जाऊन आलिजाबाहादर यांच्या आग्रहावरून
सर्वांनीं बरेच दिवस ग्वाल्हेरीस काढले.

इकडे रावबाजींचाही अवतार संपूर्ण होऊन त्यांचे
ठिकाणीं कंपनी सरकार नांदूं लागलें. यामुळें एक-
मेकांचीं पागोटीं उडविण्याचा सर्वच प्रकार नाहींसा
होऊन सर्व रंग निराळ्याच प्रकारचे झाले. ती
सर्व हकीगत वाचकांस पुढील भागांत आढळेल.

# भाग ११वा.

( भोग दशा. )

मागील भागांत यशवंतराव दाभाडे सेनापति हे आ-
पले चिरंजीव त्र्यंबकराव दाभाडे यांस सिंदे आलीजा-
बाहादर यांची मुलगी सांगून आली ह्मणून त्यांस ब-
रोबर घेऊन ग्वाल्हेरीस गेले हें सांगितलेंच आहे. ते
ग्वाल्हेरीस गेल्यावर इकडे पेशवाईचा अंत होऊन
इंग्रज सरकारचा लाल झेंडा महाराष्ट्रांत फडकूं ला-
गला हेंही पण त्या भागांत सांगितलेंं आहेच.

बाजीराव पेशवा ज्या वेळीं राज्यकारभार बघत होता त्या वेळीं महाराष्ट्रांत निव्वळ अंदाधुंदी चाललेली होती. जीं माणसें खरीं राजकारस्थानी, मसलती, शूर, लढाऊ व देशभक्त आणि राजभक्त होतीं त्यांच्यावर बाजीरावाची इतराजी होऊन तशीं सर्व माणसें घरीं बसलीं ! आणि पुष्कळ जेवणार, चांगली कुस्ती मारणार, चांगली कथा करणार, यज्ञयागादिकांत दीक्षितीचें काम बिनबोभाट करणार, आंगीं विद्या नसतां लोकांस निव्वळ फसवून त्यांचे कडून पैसे उपटणार, आपल्या कुलस्त्रिया परगृहीं खुषीनें पाठविणार इत्यादि निरुपयोगी व बष्कळ माणसांचीच दरबारांत भरती झाल्यामुळें दाभाडे, पटवर्धन, पुरंदरे,पानसे इत्यादि अनेक घराणीं आपोआप अंधेरांत माडलीं गेलीं आणि या कुलदीपक बाजीरावाच्या शोकामुळें असल्या वीर पुरुषांचीं कुलीन घराणीं नुसतीं अंधेरांतच राहिलीं असें नसून अन्नूच्या भयानें ज्यास जिकडे वाट फुटली तिकडे ते पुरुष मुकाट्यानें चालते होऊन स्वस्थ राहिले ! !

दरबारांत अशी स्थिति झाल्यावर बिच्याऱ्या बाजीरावाचा ताबूत इंग्रजा सारख्या दक्ष व वस्ताद लोकांस थंडा करण्यास कितीसा वेळ लागणार ? त्यांनीं बाजीरावाचा डोला जो सहज उचलला तो बाबदेवाच्या घाटानें मिरवीत मिरवीत ब्रह्मवर्तास नेऊन तेथें श्री भागीरथी नदीच्या अथांग जलाशयांत थंडा करून टाकला. बाजीरावास उचलतांना पुण्याजवळ

थोडीशी धामधूम झाली हें खरें, पण ती धामधूम इंग्रज लोकांस केवळ पोरखेळा सारखी भासली. कारण त्या लढाईंत सेनाधिपति ह्मणून जे सरदार रणांगणीं आले होते ते यथेच्छ जिलबी साखरभातावर तात्र मारून आलेले असून लढाईच्या वेळीं पालख्यांतून बसून पोटावर हात चोळीत होते आणि त्यांस जन्मांत कधीं लढण्याचा प्रसंग नसल्यामुळें पालखींत एकादा गोळा किंवा गोळी येऊन अनर्थ होईल या भीतीनें त्यांनीं आपापल्या पालख्यांचे पडदे मोकळे सोडून दिले होते!! अशी जय्यत फौज ज्या समरंगणांत आली होती त्या समरंगणाची पर्वा आपले इंग्रज सरकार कितपत करतील याचा अंदाज करावा.

वाचकहो, या स्थितिवरून तुह्मी काय ताडलेंत बेंर? कोणत्याही देशास अनुकूळ काळ आला ह्मणजे दाभाड्यांसारखीं रत्नें जेथें अवतीर्ण होतात त्याच ठिकाणीं प्रतिकूळ काळाचा वारा सपाटून वाहूं लागला ह्मणजे बाजीराव व त्याच्या पदरचीं डेंगळे, दीक्षित, माणकेश्वर इत्यादि मंडळी अवतीर्ण होऊन सर्वांचें हिताहित त्यांच्या स्वाधीन राहतें हें खरेंना? पहा, या बाजीरावाच्या कारकीर्दींत एक तरी पुरुष पहिल्या बाजीरावाच्या किंवा थोरल्या शिवाजी महाराजांच्या हाईंत असलेल्या पुरुषांसारखा दिसत आहे काय? पहा, या वेळीं सर्व मोठमोठे पालखीपदस्थ लोक हलकट, लुच्चे, पोटबाबू व अकलेचा

व त्यांचा बारावा बृहस्पति असेच दिसत आहेत ! ! खरेंच, पूर्वींचे ते दाभाडे, मालुसरे, फसलकर, पिंगळे, भट, पटवर्धन हे अवतारी पुरुष कोठें गेले ? असो. इंग्रजांच्या घरांत राज्य घालविण्याकरितां माणकेश्वर, दीक्षित, कुंजर, डेंगळे, नातु वगैरे मंडळी तरी या वेळीं अवतारीच झाली असें ह्मणून समाधान तरी कां करून घेऊं नये ? अस्तु.

आपले यशवंतराव दाभाडे सेनापती ग्वाल्हेरीस गेल्यावर त्र्यंबकराव यांचें मोठ्या थाटानें लग्न झालें. आलिजा बहादरांनीं जावया करिता ६०,००० रुपयांची नेमणूक दाभाडे यांस करून दिली. त्या वेळीं मुरारचा किल्ला सिंदे सरकारच्याच ताब्यांत होता. तो किल्ला यशवंतराव दाभाडे यांस आलिजा बहादरांनीं रहाण्या करितां दिला. या नेमणूकीच्या सनदा वगैरेही झालेल्या आहेत. व दाभाड्यांचा वाडाही अजून ग्वाल्हेरीस आहे.

कुलीन मनुष्यास पडित काळ आला असतांही तो आपला धीर न जाऊं देतां टेकीनेंच दिवस काढतो, परंतु कोणत्याही बिकट प्रसंगीं तो मनुष्य आपला धैर्यनग ढासळवून दुसऱ्यास इजत जात नाहीं हा नियम आहे. त्या प्रमाणें आपले यशवंतराव दाभाडे जरी या वेळीं पूर्वींच्या मानानें पाहिलें तर बिकट प्रसंगांतच सांपडले होते, तथापि त्यांस मुलाच्या सासूरवाडीवर मजा मारीत स्वस्थ रहाणें कधींही आवडलें नाहीं. त्यांनीं ६०,००० रुपयांच्या

नेमणूकीची विशेषशी परवा न करितां आपल्या स्नुषा पुत्रासह देशीं येण्याचा बेत ठरविला व तो बेत नुसता मनांतच ठेविला असें नसून त्यांनीं लागलीच आपला मुक्काम ग्वाल्हेरीहून हालवून तळेगांवची वाट धरली व तळेगांवीं येऊन कांहीं दिवस तेथेंच काढले.

तळेगांवीं आल्यावर त्यांनीं तेथें एक मोठा व रमणीय बाग तयार केला. त्यास अद्याप "यशवंत बाग" असें नांव चालत आहे. या वेळीं दाभाड्यांकडे मौजे तळेगांव व कसबे इंदुरी हे गांव इनामी असून शिवाय मोकासा, सरदेशमुखी, सरपाटीलकी, जकात बाब, कलाली, बाजार बैठक, कमाविशी वगैरे पुष्कळ हक्कांचें मिळून सुमारें सालीना ४९,००० हजारांचें उत्पन्न राहिलेलें होतें. त्यांत पारनेर, साकुर्डी व आणखी तर्फानिहाय सरपाटीलकी व सरदेशमुखी व मोकासा मिळून सुमारें ६९०० रुपयांचें उत्पन्न होतें. तळेगांव व इंदुरीचे इनामा बद्दल सुमारें ७,९०० रुपये उत्पन्न होत असत. पौंड, मांदेडें, आकुर्डी, उंबरें उरसें, चांदखेड वगैरे ठिकाणच्या फक्त पाटीलकी बद्दल ९०० रुपये येत. तसेंच तळेगांव, इंदुरी, उंबरें व शेव येथील जकातीचें सुमारें ४००० रुपये उत्पन्न होत असे. बाकीचें उत्पन्न किरकोळबाबतींत होई. यशवंतराव तळेगांवीं असे पर्यंत हें सर्व उत्पन्न त्यांचेकडे चालत होतें.

थोड्याच दिवसांनीं यशवंतराव दाभाडे यांनीं क्षेत्र वास करण्याचा विचार मनांत आणून आपल्या सं-

स्थानचा सर्व कारभार आपले पुत्र त्र्यंबकराव दाभाडे सेनापति यांच्या स्वाधीन करून आपण मथुरेस जाऊन राहिले. तेथें गेल्यावर त्यांनीं गोपाळ कृष्णाचें एक सुंदर मंदीर बांधून आपल्या करितां एक वाडाही बांधला आहे. त्याच प्रमाणें त्यांची उपस्त्री भागिरथी बाई नांवाची होती, तिनेंही श्री मथुरा येथें एक मोठी धर्मशाळा बांधलेली आहे. अद्यापही या इमारती कायम असून दाभाड्यांच्या घराण्याचा मोठेपणा व औदार्य जगास सांगत आहेत. या इमारतींची व बागबगीचाची देखरेख दाभाड्यांच्या मुख्त्यारा मार्फत अजून चालत आहे.

यशवंतराव दाभाड्यांचा कांहीं काळ मथुरेस गेल्यावर त्यांचा अंतही तेथेंच झाला. ते वारल्यावर अर्थातच सर्व संसारचक्राचा भार त्यांचे एकुलते एक पुत्र त्र्यंबकराव दाभाडे यांच्या शिरावर येऊन पडला.

त्र्यंबकराव दाभाडे सेनापति यांचा संबंध आलिजा बहादरांच्या कन्येशीं झाला होता हें वर सांगितलेंच आहे. परंतु या बाईचा त्र्यंबकरावास फार दिवस सहवास झाला नाहीं. लग्न झाल्यावर सुमारें ९ वर्षांनींच त्र्यंबकराव दाभाड्यांचें हें कुटुंब परलोकवासी झालें. अर्थात या बाईच्या मरणानें शिंद्यांचा व यांचा संबंध तुटल्या सारखा झाला. त्या नंतर त्रिंबकरावांनीं आपलें दुसरें लग्न केलें. मुलगी कोल्हापूरच्या गायकवाड घराण्यांतील केली होती.

त्या बाईपासून त्रिंबकराव यांस बाबुराव नांवाचें एक पुत्ररत्न झालें व हेंच पुढें दाभाड्यांच्या गादीचे मालक ठरलें.

त्रिंबकरावांनीं आपल्या कारकीर्दींत पदरच्या खर्चानें आपल्या वतनदारीच्या गांवीं एक मोठा तलाव बांधला. या तलावाचें काम सुरेख व बरेंच मोठें असून अद्यापही तें नव्या सारखें दिसत आहे.

त्र्यंबकराव दाभाडे यांच्या कारकीर्दींत यशवंतराव दाभाड्यांच्या वेळीं जें या संस्थानाचें उत्पन्न होतें तें तसेंच कायम होतें. यांची अखेर तळेगांव मुक्कामींच झाली.

त्र्यंबकराव दाभाडे यांच्या मागून दाभाड्यांच्या गादीवर त्यांचे पुत्र रा० बाबूराव दाभाडे सेनापति हे बसले. यांचें पहिलें कुटुंब संगमनेरकर गुंजाळ यांच्या घराण्यांतील होतें. पहिलें कुटुंब वारल्यावर धारचे श्री० महिपतराव पेवार यांच्या कन्येशीं लग्न झालें. बाबूराव दाभाडे यांचें व त्यांच्या मातोश्रींचें मन शुद्ध नव्हतें. यामुळें त्यांस तळेगांवीं रहाण्याची फारशी गोडी वाटत नसे. यांस शिकारीचा नाद फार होता. यांनीं शेंकडो वाघ आपल्या हातानें मारले.

यांच्या कारकीर्दींत श्री० बायजाबाई शिंदे यांची स्वारी दक्षिणेंत आली होती व बाबूराव दाभाडे सेनापति यांस मुद्दाम भेटण्याकारितां त्या तळेगांवीं गेल्या होत्या. तेथें दाभाड्यांनीं त्यांचें आदरातिथ्य

उत्तम प्रकारें राखलें होतें. बायजाबाई परत जातांना त्यांनीं बाबूरावसाहेब दाभाडे यांस हिंदुस्थानांत येण्याचा विशेष आग्रह केल्यावरून दाभाडे हे बाईसाहेबांच्या अगोदरच उज्जनीस जाऊन दाखल झाले. ते तेथें पोंचल्यावर मागाहून बायजाबाईची स्वारीही तेथें जाऊन पोंचली. परंतु बाईसाहेबांची स्वारी पोंचल्यावर थोड्याच दिवसांनीं बाबूराव दाभाडे सेनापति यांचा एकाएकीच दुखणें वहाणें कांहीं एक दिसून आल्या शिवाय अंत झाला!

ही दुःखकारक गोष्ट घडून आली त्या वेळीं यांच्या कुटुंबाचें वय फारच लहान होतें. या त्यांच्या कुटुंबाचें नांव आनंदीबाई दाभाडे असें होतें. पतीच्या मरणाची कुऱ्हाड त्यांच्यावर बसली त्या वेळीं या बाई ऋतुमतीही झालेल्या नव्हत्या! यामुळें बाबूरावसाहेब दाभाडे यांच्या मृत्युनें बाईस व सर्वांपेक्षां धारचे पवार महिपतराव यांस अनिवार्य दुःख झालें!

झाल्या गोष्टीस उपाय नाहीं हा पोक्त विचार मनांत आणून पवारांनीं आपल्या तरूण कन्येच्या संस्थानचें रक्षण होण्याकरितां आपल्या तर्फेनें बाबूराव दाभाड्यांच्या प्रथम कुटुंबाचें बंधू रा० नारायणराव पाटील गुंजाळ संगमनेरकर यांस कारभारी नेमून दिले. यांस मामासाहेब असें ह्मणत असत.

आनंदीबाई दाभाडे यांच्या कारकीर्दींतच आपलें इंग्रज सरकार बहादुर यांची "इनाम कमेटी"

नांवाची एक कमिटी बसली. या कमिटीनें या संस्थानच्या संबंधांत असें ठरविलें कीं, या संस्थानचें उत्पन्न सरंजामी असल्यामुळें औरससंतती शिवाय दुसरे कोणाकडे चालूं नये. सबब बाईच्या तहायात हें इनामाचें उत्पन्न चालावयाचें. अर्थात बाईस दत्तक घेण्याची परवानगीही नसलीच पाहिजे!

बाईंची कारकीर्द चालू असतांच इंग्रज सरकारानें जकातबाबी, दारूकलाली व घरपट्टी हे हक्क बाईस पैसे देऊन विकत घेतले. अशा प्रकारें या संस्थानचे हक्क एकेक नाहींसे होऊन आनंदी बाईच्या अखेर दाभाड्यांच्या संस्थानचीही अखेर व्हावयाची, हा विचार मनांत आणून पवार यांनीं बाईच्या मांडीवर कोणास तरी दत्तक द्यावें अशी योजना केली. हा विचार बाईस कळवितांच बाईंच्याही मनांत ती गोष्ट येऊन दत्तक कोण घ्यावा हा विचार सुरू झाला. परंतु दाभाड्यांच्या सर्व कुळांत गादीस शोभेल असा मुलगा नसल्यामुळें आनंदी बाई दाभाडे यांच्या मनांत आपला कनिष्ठ बंधु दत्तक घ्यावा असें आलें आणि तीच गोष्ट त्यांनीं आपल्या वडिलांच्या कानावर घातली.

वडिलांनीं प्रथम तर तिचा निषेधच केला व मला माझीं मुलें फार झालीं नाहींत असें उत्तर दिलें. परंतु बाईंनीं विशेष आग्रह धरल्यावरून अखेर वडिलांनींही ती गोष्ट मोठ्या जुलमानें मान्य केली.

कर्मधर्म संयोगानें आपल्या दयाळू इंग्रजसरका-

रांनेंही बाईस दत्तक घेण्याची मंजुरी दिली. मग काय विचारावयाचें आहे? मुसळास अंकुर फुटून त्याचा मोठा वृक्ष होणें हें जितकें अघटित आहे तितकीच अघटित घटना दाभाड्याबाईंच्या दत्तविधानांत दृष्टोत्पत्तीस आल्यामुळें बाईस मोठा आनंद झाला. त्यांतही सख्खा धाकटा भाऊ मांडीवर घ्यावा ही जी उत्कट इच्छा तीही पुर्ण झाल्यावर आनंदीबाईच्या आनंदास काय विचारावें !!

ही मंजुरी मिळाल्याबरोबर आपले कनिष्ठ बंधु रा० अमृतराव ऊर्फ आबासाहेब पोवार यांचें दत्तविधान करण्याचा बाईंनीं मुहूर्त ठरवून सर्व जय्यत तयारी केली. त्या वेळीं अहमदनगरचे कलेक्टर साहेब सरकार तर्फे येऊन त्यांनीं आपल्या हातानें आनंदीबाईचे दत्तक पुत्र रा० खंडेराव आबासाहेब दाभाडे यांस संस्थानचे सर्व अधिकारासह सन १८७० सालीं गादीवर बसविलें. हेच आबासाहेब दाभाडे हल्लीं दाभाड्यांच्या कुलास उत्तम रीतीनें भूषवीत आहेत.

श्री० आबासाहेब दाभाडे सेनापति यांचें पहिलें कुटुंब अक्कलकोटकर राजे यांची कन्या होय. पण ही बाई थोडक्याच अवकाशांत परलोकवासी झाल्यामुळें पाटस येथील शितोळे यांच्या कन्येशीं यांचा दुसरा विवाह झाला. व हें आबासाहेबांचें कुटुंब हयात असून आपल्या पातिव्रत्य धर्मानें आपल्या प्रिय पतीस आनंदवीत आहे.

आबासाहेब दाभाडे यांचें वय हल्लीं तिशीच्या सुमाराचें आहे व दाभाड्यांच्या घराण्यांत येऊन त्यांस फक्त १६।१७ वर्षेंच झालीं आहेत. पण तेवढ्या अवकाशांत त्यांनीं आपल्या संस्थानची जी व्यवस्था जगास दाखविली आहे त्यावरून या संस्थानाला शोभेल असाच पुरुष दाभाडेबाईंनीं निवडून काढला असें लोक ह्मणत आहेत.

हल्लीं संस्थानचें उत्पन्न विशेष नसून सुमारें १९ हजारांपर्यंत राहिलेलें आहे. सरकारानें सरंजाम ह्मणून जें इनाम खालसा केलें आहे तें अद्यापही आबासाहेब दाभाडे "हें सरंजामी उत्पन्न नव्हे" असें कानीं कपाळीं ओरडत असतांही सरकार सोडीत नाहीं. तथापि इंग्रजसरकार पूर्ण न्यायी व विचारी असल्यामुळें या घराण्याच्या इनामाचा अपहार खचीत करणार नाहीं व थोड्याच दिवसांत आजपर्यंतच्या उत्पन्नासुद्धां आमचें पूर्ण दयाळू सरकार दाभाड्यांचें इनाम त्यांस परत देतील अशी भरपूर आशा आहे.

तात्पर्य इतक्या थोडक्या उत्पन्नांत देखील आबासाहेब आबादाबानें राहत असून त्यांच्या घराण्याच्या ज्या जुन्या व दबदार चालीरीती आहेत त्या त्यांनीं अद्यापही कायम ठेवलेल्या आहेत. आबासाहेबांच्या ऐपतीप्रमाणें त्यांचें औदार्यही वारंवार दिसून येतें. एकवेळ सर्व हिंदुस्थानांत ज्यानीं तरवार गाजविली त्यांच्या वंशास हे जोडले गेले आहेत व

लिहिण्यास आनंद वाटतो कीं, प्रसंगविशेषीं मोठ-मोठ्यांशीं देखील ते मेचून राहतात असें आढळत नाहीं. मेहरबान कलेक्टर साहेबांपासून तों नाम-दार गव्हरनर साहेबांपर्यंत कोणीही कामदार यांचा उपमर्द करीत नसून यांस योग्य असा मानच देतात. अकुलीन मराठ्यांच्या मनांत आपसांत दुही पडण्या-चे जे विचार नेहमीं घोळत असतात त्यांचा गंधहीं या गृहस्थाच्या आंगांत वसत नसून उलट स्वधर्मावर व कुलपरंपरेनें चालत आलेल्या आचारांवर यांची उत्तम प्रकारची श्रद्धा आहे. अलीकडील श्रीमंत लोकांच्या स्वभावांत जो एककल्लीपणा आढळतो तो यांच्या ठिकाणीं नसून आबासाहेब चांगले मनमिळा-ऊ आहेत. एकंदरींत सांगण्याची गोष्ट इतकीच कीं, ज्या खंडेराव, यशवंतराव, त्रिंबकराव व बाबु-रावादि वीर पुरुषांनीं आपलीं शिरकमलें स्वराजनि-ष्ठेनें व स्वदेश उन्नत्यर्थ धारातीर्थीं अर्पण केलीं त्यांच्या वंशास प्रसंग आलाच तर हे उत्तम प्रकार-ची शोभा देतील असें यांच्या वागणुकीवरून सर्वांस वाटत आहे.

आजकाल सर्व सृष्टींत पाहूं गेलें तर असा ए-कही संस्थानिक—मग तो बडा असो वा छोटा असो—आढळत नाहीं कीं, त्याचें पाऊल अहार विहारा-च्या संबंधानें वांकडें ह्मणून पडलेंच नाहीं! परंतु या छोटेखानी सरदार घराण्यांतील पुरुषास त्याचा वासही नसून उलट दाभाडे हे अशा दुर्व्यसनाचा

व नीच अशा दुर्व्यसनासक्तांचा मनापासून तिरस्कार करतात ही केवढ्या आनंदाची गोष्ट आहे बरें ?

असो. आबासाहेब दाभाड्यांच्या कारकीर्दींत वर्णन करण्यासारखी अशी कोणतीच गोष्ट आज पर्यंत घडून आली नाहीं. तथापि या पुरुषास शिकारीचा बराच नाद असून यांच्या हातून उपद्रविक अशा हिंसक पशूंची बरीच शिकार होऊन लोकांचा ताप दूर झाला आहे. यांचा जात्या स्वभावही अंमळसा तलख व मानी आहे. बडोद्याचे गायकवाड हे जरी हल्लीं मोठ्या थोरल्या राज्याचे आधिपती आहेत व आबासाहेब दाभाडे जरी आज किरकोळ इतमामदार आहेत, तथापि गायकवाडां-चें ह्मणून जें हल्लीं राज्य आहे तें सर्व राज्य दाभाड्यां-च्या पुरुषांनीं आपलीं शिरें समरंगणांत अर्पण करून संपादन केलेलें आहे व त्याचे खरे मालक दाभाडेच आहेत आणि गायकवाड हे केवळ चाकर आहेत असें समजून श्री० सयाजी राव गायकवाड यांची स्वारी पुण्यास आली होती त्या वेळीं हे मानी गृहस्थ त्यांस भेटावयास गेले नाहींत ! ! अस्तु.

बहुतेक नव्या व जुन्या सरदारांचे पुणें शहरांत लहान मोठे वाडे होते व आहेतही, पण दाभाडे व पेशवे यांचें फारा दिवसांपासून नीट नसल्यामुळें दाभाड्यांचा वाडा पुण्यास मुळींच नव्हता. त्यामुळें आबासाहेब दाभाडे यांस पुण्यांत आल्यावर रहा-ण्याची मोठी भानगड पडत असे. हें मनांत आणून हल्लीं नानाच्या पेठेंत पार्शी लोकांच्या

आग्यारी नजीक सुमारें ६०,००० रुपये खर्च करून एक टोलेजंग व सोईकर असा वाडा आबा-साहेबांनीं बांधला आहे. या वाड्याचें काम पुरें होऊन अद्याप त्याची वास्तुशांतही झालेली नाहीं, तथापि वाड्याचें काम फारच उत्तम झालें आहे असे लोकांचे उद्गार निघत आहेत. त्यांतही विशेष सांगावयाची गोष्ट अशी आहे कीं, या वाड्याचें मोजमाप, आकार व नकाशा ( डिझाईन वगैरे ) करण्यास इंजिनेर वगैरे कांहींएक नसून तें काम स्वतः आबासाहेबांनीं केलेलें आहे ! व तें सर्व काम—अपूरेंतच आहे तरी—खुद्द नामदार गव्हरनर साहेब लार्ड रे यांनीं पाहून आबासाहेबांची तारीफ केली ! यावरून यांच्या आंगांतील बरेच सुगुण बुद्धिवान लोकांस दृग्गोचर होतील.

अशा प्रकारें आबासाहेब दाभाडे यांचीं स्थिति आनंदित असूनही यांच्या मनास एक मोठा हुर्‍हुंग लागलेला आहे. त्याच्या योगानें त्यांचें मन कंव्हां केव्हां उदास झालेलें दिसतें. तो हृदयस्थ रोग हाच कीं, यांस औरस मुलींच नाही. आजपर्यंत त्यांस ३।४ मुलें झालीं, पण त्यांतील एकही मूल या गृहस्थास लाभलें नाहीं ! करितां यांच्या आंगचे हे सर्व सुगुण पाहून व या घराण्याचा पराक्रम, नेकनामी, इमान, राजनिष्ठा व मानीपणा इत्यादि सुगुण मनांत आणून अशा घराण्याचे निदान बारीक सारीक तरी अंकूर आमच्या देशांत राहून प्रसंग विशेषीं रात्रेंतील फुलगीप्रमाणें

वेळेस देशोन्नतीच्या उपयोगी पडावेत या हेतूनें सच्चीदानंद प्रभूनें यांच्या मनांतील हा हृद्रोग घालवून या दाभाडच्याच्या घराण्यांचा वेलविस्तार वाढावा एवढीच हें पुस्तक लिहिणाराची व त्याच्याच सारखे जे कोणी स्वदेशभक्ती परायण असतील त्यांची पूर्ण इच्छा आहे. ती इच्छा सर्वसाक्षी परमेश्वर पुरी करो !!

# भाग १२ वा.

( पर्यवसान )

वाचकहो ! आतां आपल्यास या घराण्याच्या संबंधानें विशेष तसदी देत नाहीं. तथापि या सोज्वळ पण हल्लीं र्‍हास पावलेल्या घराण्याची ही सर्व हकीगत वाचून मनुष्याच्या मनावर निरनिराळ्या प्रकारचे किती तरंग उठतात पहा ! प्रथम या दाभाडच्यांच्या पूर्वजांची स्थिति यसपाटील, बाजपाटील यांच्या वेळीं कशी होती ? त्या वेळीं देशांत मुसलमानांच्या अखेरीस धामधूम होण्याचा कसा सुमार होता, ती धामधूम लागलीच उदयास येऊन त्यापासून काय निष्पन्न झालें, धामधूम झाली त्यांत तरी मुसलमानांची कोणती चूक होती, हिंदूंस कोणती संधी उपयोगी पडली, त्या नंतर खंडेरावच्या कारकीर्दींत मुसलमानांची कशी दशा उडाली व हिंदुलोकांचा उदय काळ कसा झाला, पुढें यशवंतराव

त्र्यंबकराव व बाबूराव यांच्या कारकीर्दीत परकी लोकांच्या दुष्टक्लिप्तीनें अपसांत दुही कशी माजली, त्याचा परिणाम या आपल्या वीर पुरुषांवर कसा झाला, त्याच्या योगानें देशाची हानी केवढी झाली, दाभाड्यांच्या पुढील पुरुषांच्या व बायकांच्या कारकीर्दी कशा झाल्या व त्यांच्यावर लबाड लोकांनीं कसे हल्ले केले, त्याचा अखेर परिणाम काय झाला, मराठेशाही लयास कशी गेली, इंग्रजांचा पाय कसा आंत शिरला वगैरे गोष्टी या घराण्याच्या इतिहासाचा आपण सूक्ष्म रीतीनें विचार केला ह्मणजे मूर्तिमंत आपल्या डोळ्या पुढें येऊन उभ्या राहतात. व एवढ्याशा २०० वर्षांत आपल्या या महाराष्ट्रांत व त्याच्या अनुरोधानें अंशतः तरी इतर प्रांतांतही केवढाल्या उलाढाली झाल्या, किती राज्यक्रांत्या झाल्या, कसलाले घोटाळे झाले याचा विचार करूं लागले ह्मणजे मन थक्क होऊन जातें !

मुसलमानांची केवढी अवाढव्य शक्ति व लोकांवर त्यांचा केवढा दरारा ? देशांत सर्वत्र ठिकाणीं या हुसन दीक्षितांवांचून एक वीटभरही जागा रिकामी नव्हती ! तेच मुसलमान कांहीं दिवसांनीं सैरावैरा हिंडूं लागून देशांत चोहींकडे मराठ्यांचे भगवे झेंडे फडकूं लागले ! ! ते तरी चिरस्थाई झाले काय ? छे, मुळींच नाहीं. त्यांचे झेंडे आटकेपासून रामेश्वरापर्यंत लागतात न लागतात तोंच हजारों परस्थ

व परधर्मी लोकांचा पगडा या आर्यमातेवर बसून हल्लीं त्यांचेंच एकछत्री राज्य पसरलेलें आहे !

तेव्हां या सर्व उलाढाल्या कां झाल्या व कोणी केल्या याचा विचार करूं लागलें तर कांहींच सुचत नाहीं. मुसलमानांची चलती होती त्या वेळीं हिंदुंची व्यवस्था काय होती, मुसलमानांचा ऱ्हास होण्याच्या समयास हिंदु लोकांत कोणत्या प्रकारची मंडळी अवतीर्ण झाली आणि पुनः हिंदुंच्या पडित काळींही त्याच हिंदुंच्या वंशांत कोणत्या प्रकारचे अवतार झाले हें सूक्ष्म रीतीनें पाहिलें ह्मणजे या अनंतकोटि ब्रह्मांडांचा जो जनक त्याच्या अघटित घटनेचें मोठें कौतुक वाटतें आणि ईश्वरेच्छेवांचून पानही हालत नाहीं असें जें श्रेष्ठ लोकांचें ह्मणणें आहे तेंही अक्षरशः खरेंच आहे अशी खात्री होते. तर अशा त्या जगच्चालकावर सर्व भार न टाकतां हें मीच केलें, हें मीच करतों व हें मीच करीन असा शहाण्या मनुष्यानें अभिमान बाळगणें व्यर्थ नव्हे काय? अस्तु.

तूर्त आपण या दाभाड्यांच्याच घराण्याकडे पाहिलें तर यांच्या पुरुषांनीं पूर्वीं केवढालें पराक्रम करून हजारों कोसांचा मुलूख कसा प्राप्त करून घेतला व त्या मुलुखाचा हल्लीं गायकवाड कसा फुकट उपभोग घेत आहे आणि खुद्द एवढा मुलूख मिळविणाराचे वारस श्री. रा. आबासाहेब दाभाडे हे आपला काळ कसा घालवीत आहेत हें सूक्ष्म रीतीनें पाहिलें ह्मणजे त्या सर्व शक्तिमान व सर्वसाक्षी

परमेश्वराच्या अगाध कृतीचें कौतुक कां वाटणार नाहीं? अलबत वाटलेंच पाहिजे. करितां शेवटीं आपण अशा अगाध लीला दाखविणाऱ्या जगन्नियंत्यास अंतःकरणपूर्वक आळवून आपल्या देशांत आपल्या दाभाड्यांसारखीं अवतारी माणसें उत्पन्न करून आमच्या या पतित झालेल्या आर्य मातेचा उद्धार कर अशी त्याची प्रार्थना करून ह्या लहानशा, पण एटदार घराण्याचा हा लहानसा इतिहास पुरा करूं.

श्रीकृष्णार्पणमस्तु.